"Cowards die many times before their deaths;
The valiant never taste of death but once."

—*Shakespeare.*

## मेलेल्या नाटककारांचे

# जिवन्त नाटक!

लेखक–

विश्वेश्वर.

किंमत आठ आणे.

सदय शांत असशी मरणा ॥ भीति तुझी वाटेना ॥ ध्रु० ॥
हीन दीन दुःखी दुबळीं ॥ ज्यांस ओस दुनिया सगळी ॥
येति त्यांस घेसी जवळी ॥ प्रेम तुझें आटेना ॥ १ ॥

—कै. देवल.

मेलेल्या नाटककारांचे

# जिवन्त नाटक!



लेखक—

विश्वेश्वर.

१९३१.

किंमत आठ आणे.

## ❀ समर्पण. ❀



ज्यांच्या स्मरणाने मराठी रंगभूमीचे जिवन्त
चित्र डोळ्यापुढे उभे राहिले व प्रस्तुत चार
ओळी लिहिण्याची प्रेरणा झाली, त्या सर्व
महाराष्ट्रीय नाटककारास हे बिनअटक
नाटक प्रणिपातपूर्वक अर्पण
करीत आहे.

— लेखक.

## दे. भ. डॉक्टर माधवराव सुरतकर यांची

# प्रस्तावनेसाठीं प्रस्तावना !*



**"प्रिये ! पडद्यांतील काम पुरं झालं असेल तर जरा बाहेर ये पाहूं."**—किर्लोस्कर.

अशी विनवणी जुन्या संगीत नाटकांतील सूत्रधारांना नाटकारंभीं करावी लागत असे; नवमतवादी व मंगलाचरणाच्या प्रस्तावनेला अप्रस्तुत ठरविणारे कांहीं दुर्धारक लोक घुस्सा आल्यामुळें गरम भज्याप्रमाणें टरटरून फुगून जात ! तसाच कांहींसा प्रकार, ग्रंथलेखक व प्रस्तावनालेखक हे भिन्न असल्याचें दिसून येतांच कांहीं तमप्रधान प्रकृतीच्या वाचकांच्या परीक्षणांत दिसून येतो. ग्रंथलेखक आपलें कार्य एखाद्या गर्भवती युवतीप्रमाणें ठाकठिकीनें करतो. पण अपत्य दृष्टोत्पत्तीस येण्याचे सुमारास तिला सुइणींची गरज लागल्यास त्यांत गैरवाजवी असें काय आहे ?

प्रस्तुत पुस्तक हें '**मेलेल्या नाटककारांचे जिवन्त नाटक**' म्हणूनच पुढें येत असल्यामुळें, सूत्रधाररूपी ग्रंथलेखकाचें लिहूं घेतलेलें नाटक——खुद्द मेलेले नाटककार नटरूपानें रंगभूमीवर येऊं घातलेले पहातांच——प्रस्तावना-लेखनरूपी नटीची आवश्यकता भासल्यास ती एक मौज—नवी मौज—नव्हे काय ? ह्यांतील खरी गम्मत खानदानी रसिक जनांना समजणारी असल्यामुळें त्यांनीं हें पुस्तक लक्ष लावून वाचावें म्हणजे तरुण ग्रंथकार श्री. **विश्वेश्वर** ह्यांनीं मोठे परिश्रम घेऊन, "**अलल्डूर्रर्र**" च्या गद्य नाट्यकालाचे सूत्र-चालक सांगलीचे श्री. **भावे**, ह्यांच्यापासून तों नुकतेच दिवंगत झालेले कै. **दे. भ. अ. ब. कोल्हटकरां**पर्यंत झाडून सारे मृतावस्थेंत गेलेल्या महाराष्ट्रीय नाटककारांचें हृद्गत् कसें ओळखिलें आहे, हें त्यांच्या सहजच ध्यानांत येईल.

---

* प्रस्तावनेचा प्रस्तुत मजकूर डॉक्टरमजकुरांच्या अपरिहार्य अडचणीमुळे पुस्तके बांधून झाल्यावर 'stop press' म्हणून जरी आला असला, तरी त्याचे महत्त्व लक्षात घेऊन, डॉक्टरसाहेबांविषयीची आदरबुद्धि व्यक्त करण्याची संधि वाया जाऊ नये म्हणून छापखान्यालाच थोडा त्रास देऊन, आम्ही तो छापिला आहे.—**लेखक.**

ह्या नटांच्या तोंडून जीं जीं भाषणें वदविलीं आहेत, तीं मोठीं मार्मिक व सत्य-वस्तुदर्शक आहेत; कांहींचीं खरीं स्वरूपें त्यांत प्रतिबिंबीत झालीं आहेत ह्यांत शंका नाहीं.

ह्या 'मेलेल्या नाटककारांचे' नाटकांत जिवंतपणाचे ताजेपणानें बोल बोलणाऱ्या नाट्यकार नटांचीं एकमेकांस घालून पाडून बोलणीं ऐकलीं, म्हणजे व्यंगोक्तीची खरी वाचा मृतावस्थेनंतर बेधडक फुटूं लागते, ही गोष्ट अनायासें सिद्ध झालेली दिसते !

आतां ह्या 'मेलेल्या नाटककारांचे जिवन्त नाटकां'त बिचाऱ्या 'हयात' नाटयकारांना आतांपासूनच स्वर्गीय विचारविनिमय करण्यास लावण्याचा मोह नाट्यलेखकास झालेला दिसतो ! पण हें सारें नाटक केवळ स्वप्नांतच तयार झालेलें असल्यामुळें, वर्तमानकाळीं वावरणाऱ्या नाट्याचार्यांनीं, प्रस्तुत नाट्य लेखकानें केलेली आगळीक मनावर न घेणें हेंच बरें !

गेल्या अर्ध शतकांतल्या ह्या दिवंगत झालेल्या, पितृस्थानापन्न असलेल्या नाटककारांविषयीं आपण खुशाल असें म्हणावें कीं, one is a type of cold formation. अर्थात् नवमतधारी तरण्याबांड नाट्यलेखकाविषयीं while the other persons-the dancing egotism of a youth. म्हणजे एक जुन्या प्रणालीचा थंड वृत्तीचा माणूस ! तर दुसरा नवजवानांच्या परंपरेंत वाढलेला, वाङ्मयोद्यानांत धांगडधिंगा घालणारा ! म्हणून आपण वर्मी लागणारी टीकादृष्टि आड करावी. कारण एवढेंच कीं, ह्यांत लेखकाचा हेतू पिढीजाद द्वेषबुद्धीचा नसून, '**रुचेल तें बोलावें**' अशा प्रामाणिक वृत्तीचा आहे.

अलीकडे नवविचारी लेखकरूपी शिलेदारांत एकांडेपणा हमखास दिसून येतो. कित्येकांस 'आत्मत्वा'च्या भूतबाधेनें पछाडलेलें असतें. त्यामुळें त्यांच्या कसल्याहि व कुठल्याहि लेखनांत भारलेला आविष्कार भरभक्कमपणानें दृष्टोत्पत्तीस येतो. तसला प्रकार प्रस्तुत तरुण व प्रासादिक लेखक श्री. **विश्वेश्वर** ह्यांच्यांत दिसत नाहीं. त्यामुळें विविध स्वभावधारी नाट्यकाराच्या नटस्वरूपांत ते एकरूप होऊन देखील आपलेपणास पारखे झाले नाहींत. विविक्षित तादात्म्यभावामुळें बहुतेक नटांच्या अंतरंगाचा ठाव घेतां येऊन, अनेक विचारणीय सुभाषितें त्या त्या पात्राच्या कपोलभागावर जणुं विखुरलेलीं

असावींत असा आभास होतो. ह्याच परिस्थितींत लेखकाच्या लेखनास काव्याचें अभिजात स्वरूप प्राप्त होत असतें. ह्या पुस्तकाचा तशा दृष्टीनें विचार केल्यास,

**काव्य, कला व कौशल्य**

ह्या तिन्ही गुणांच्या परिमाणूंचा त्रिवेणीसंगम झालेला आहेसा दिसतो. स्वयंभावनानुकूल भाषेची गेंदेबाज गुंफणी करण्याची संवय लेखकास आनुवंशिक गुणप्रकर्षामुळें प्राप्त झालेली दिसते; व बालपणापासून वाङ्मयदेवीचें तपाचरण, त्याचे वृद्ध पिता—प्रसिद्ध महाराष्ट्रीय नाटककार, एकेकालीं मराठी रंगभूमीवर गाजलेल्या **संगीत 'संभाजी'** नाटकाचे कर्ते—नाट्याचार्य श्री. **आत्माराम मोरेश्वर पाठारे** ह्यांच्या देखरेखीखालीं झालेलें असल्या-मुळें, नाट्यकलेची अभिवृद्धि इच्छिणाऱ्या नटांस व प्रेक्षकांस हें पुस्तक बराच विचार करावयास लावील ह्यांत शंकाच नाहीं. **महाराष्ट्रीय नाट्य-संमेलना**च्या चालकांनीं ह्या दृष्टीनें सदहू लेखकाच्या विचारसरणीचें कौतुकच केलें पाहिजे. कारण,

**गत नाट्यकारांच्या काव्यदृष्टीपेक्षां**

त्यांचा नाट्यलेखनाचा मनोभाव कोणता असावा, इतर कवींचीं नाटकें पाहून त्यांच्या मनावर कोणते विचार उमटत असावे, आपल्या पश्चात् मराठी रंगभूमि काबीज करून बसलेल्या नाटककारांची उन्नति कशी होईल, अवनति कशी टळेल, वगैरे विषयांची चर्चा ठसठशीतपणें करण्यांत लेखकानें राष्ट्रीय दृष्टि ठेवलेली आहे. पुनरावर्तनाचा दोष पदरीं पडूं न देण्यांत व तो प्रसंग, तें वर्णन, ती विषयोन्मुख विचारसरणी वर्णन करण्यांत लेखकाची सावधानता इतर लेखकांस खास अनुकरणीय आहे.

**नाट्यप्रेक्षक व सनातनी टीकाकार,**

हा दुधारी तलवार चालविणारा नागरीक असतो. केव्हां केव्हां त्याचा टीका बरीचशी सत्यास धरून असते; पण केव्हां तर टीका करावयाची म्हणून टाका केलेली असते. नाटक म्हणजे वाईट गोष्ट ! ही बालपणापासून झालेली भावना; पण तें पहाण्याची मात्र अनावर हौस ! अशा कात्रींत सांपडलेला प्रेक्षक-टीकाकार नाट्यकलेंत काय काय सुधारणा पाहिजे, ह्याचा नीट विचार न करतां, नाटक, नाटककार व नट आणि आतां नटी, वगैरे सर्वच गोष्टी वाईट !—मग अशी समजूत उराशीं बाळगणारा प्रेक्षक नाट्यकलेस कसें उत्तेजन देणार ? तिचा वाईटपणा घालवून तिला चांगुलपणाचें वळण कसें

लावतां येईल, वगैरे गोष्टींचा विचार समाजकल्याणेच्छूंनीं करावयास नको का ? जगाची चोहोंबाजूंनीं सारखी प्रगति होत आहे. अशा वेळीं ती प्रगति आपणांस, आपल्या समाजास, आपल्या संस्कृतीस–धरमधक्का न बसतां–हितप्रद कशी होईल, इकडे आपण लक्षपूर्वक पाहिलें पाहिजे. स्वयंपाक करणारी बाई सुग्रण असली,तर ती कोंड्याचा मांडा कशी करते, ही गोष्ट **रशियन नाटककारांनीं** गेल्या दहा वर्षांत **मास्कोच्या रंगभूमीवर** सिद्ध केलेली नाहीं काय ? नूतन विचाराच्या रशियन प्रजेला सामाजिक सौख्य व राष्ट्रीय दर्जा प्राप्त करून देणारीं नाटकें तत्रस्थ नाट्यमंडळयांकडून तिकडच्या रंगभूमीवर आज चमकतात, म्हणूनच रशियन सरकारास संमत असलेल्या मतांचा फैलावा नाट्यदर्शनाच्या करमणुकीबरोबर प्रजाजनांत नकळत होत असतो. महाराष्ट्र रंगभूमीनें ह्या गोष्टींचा अवश्य विचार केला पाहिजे. असो.

ही प्रस्तावनेची प्रस्तावना आवरती घेण्यापूर्वी सदर्हु नाट्यलेखक श्री. **विश्वेश्वर** ह्यांच्या व्यक्तित्वाबद्दल लिहिणें अप्रस्तुत होणार नाहीं. सदर्हु लेखक हे अभिजात लेखनकार्यांत विविधदृष्टया कुशल असेच आहेत; पण विद्वानवर्गांत मोडणें, सरस्वतीभक्तांत जमा होणें, पंडितगिरींत दाखल असणें, ह्याचा व्यावहारीक अर्थ दारिद्र्य-पंकांत रुतणें, असाच जगांत ढळढळीतपणानें दिसतो ! अशा तऱ्हेच्या दारिद्र्य-पंकांतून—परिस्थितीच्या पाशांतून—श्री. **विश्वेश्वरां**सारखे तरुण लेखक मोकळे झाले, तर ह्यापुढें भरभक्कम अशी वाङ्मयसेवा ते निधड्या छातीनें करतील, अशी माझी खात्री आहे.

ह्या '**मेलेल्या नाटककारांचे जिवन्त नाटकां**'तील बहुतेक नाटककारांचा माझा, ह्या नाहीं त्या दृष्टीनें, जिवंतपणींचा परिचय असल्यामुळें त्यांच्या स्वर्गवासानंतर, पुनः ह्या नाट्य–पुस्तकांत स्थूल देहाच्या वाणीनें बोलत असलेले पाहून मला खरोखरीच आनंद वाटला; व ह्या आनंदाचा लाभ श्री. **विश्वेश्वर** ह्यांच्या लेखनकृतीमुळें लुटावयास मिळाला असल्यामुळें मी त्यांस अनेक धन्यवाद देतों. ईश्वरानें त्यांस सर्व प्रकारें साहाय्य होऊन त्यांच्या हस्तें नाट्य व इतर विषयांची अशीच सेवा करून घ्यावी, एवढें इच्छून हा लेख इथेंच संपवितों.

| मु० ॥ व पोष्ट<br>**मालाड**, B. B. & C. I. Ry.<br>ता. २७ ऑगष्ट १९३१. | सर्वांचा नम्र सेवक,<br>**माधव मैराळ सुरतकर.** |
|---|---|

# लेखकाचे दोन शब्द.



परिचित वा अपरिचित अशा एखाद्या थोर व्यक्तीची मिनतवारी करून प्रसिद्ध होणाऱ्या आपल्या पुस्तकाला

**प्रस्तावना–अभिप्रायाचे हळदकुंकू**

लावावयाचेच, हा आतापर्यंतचा शिरस्ता. परंतु प्रस्तुत विषयच थोडा चमत्कारिक असल्यामुळे कोणा ज्ञानवृद्धाची लेखणी विटाळू नये; निदान या पुस्तकाच्या बाबतीत ती सोवळीच रहावी, आपण केलेल्या बऱ्या वाईट विधानाबाबत कोणा शान्तिब्रह्मास समभागी करण्याचे पातक करू नये, अशी माझी मूळ समजूत.

पुस्तकातील विषयाचे महत्व विचारी वाचकाना कळल्यानंतर त्यांच्या हृदयात खळबळणाऱ्या मुग्ध परंतु सत्य विचारांची पडणारी सडेतोड साक्ष

**तीच प्रस्तावना आणि तोच अभिप्राय,**

अशा प्रामाणिक समजुतीमुळे कोणापाशी अट्टाहासी प्रयत्न करून

**विनवणीचा खेळखंडोबा**

करण्याची मला अवश्यकताच वाटली नाही.

प्रस्तुत पुस्तकातील विषय मुंबई ( फोर्ट ) येथील **सुदामा पेपर मार्टचे** मालक श्री. **मगनलाल मा. जव्हेरी शेट** यांच्या मालकीच्या

'**नवी मौज**' या साप्ताहिकात ता. ३१ डिसेम्बर १९२९ ते ता.३१ मार्च १९३० पर्यंत '**कैलासवासी* नाटककारांची बैठक**' या मथळ्याखाली प्रसिद्ध झाला होता. तरी पुस्तकरूपाने त्या विषयाचा आस्वाद सर्व दर्जाच्या वाचकाना घेता यावा, ठळक मुद्यांची विचारणा व्हावी म्हणून काही ठिकाणी अधिक मजकूर घालून, या स्वरूपात तो वाचकाहाती देण्याचे ठरविले.

भ्रातृवत् मजवर प्रेम करणारे माझे मित्र श्रीयुत **केसरीनाथ माधवराव नाडकर्णी** यांच्या परिश्रमामुळेच हे पुस्तक आज वाचकांच्या सेवेला रुजू होत आहे. या त्यांच्या ऋणाबद्दल त्यांचे मानावे तितके आभार थोडेच होतील!

लोअर चेन्दणी, **ठाणे**,<br>**नारळी पौर्णिमा**,<br>ता. २७ ऑगष्ट १९३१.

सर्व सज्जनांचा नम्र,<br>**विश्वेश्वर.**

*'कैलासवासी' ही शब्दयोजना हिन्दु-पिण्डप्रकृतीमधील अन्धश्रद्धा-द्योतक असल्यामुळे लेखमालेचा उपरोक्त मथळा बदलून या पुस्तकास प्रस्तुतचे नवीन नाव दिले.

---

## चुकांची दुरुस्ती.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | ८ | उभारणी | उभाराणि |
| ४३ | १० | दुष्टान्त | दुष्टान्न |

दे. भ. बॅरिस्टर जयकर यांचा मार्मिक अभिप्राय.

# हिन्दु समाज

आणि

# पतित स्त्रियांची सुधारणा.

लेखकः—विश्वेश्वर.

अखिल हिन्दु समाजाच्या भावी परंतु एकजिनसी संघटनाची तिडीक उत्पन्न करणारी व पतित भगिनींच्या व्यवसायावर प्रहार करणारी ह्या छोटयाशा पुस्तकातील विचार-क्रान्ति जातिवन्त हिन्दु विचाराच्या हिन्दूला पटल्याशिवाय मुळीच रहांवयाची नाही. पुस्तके मुम्बईत सर्व बुकसेलराकडे पुढील पंधरवड्यात मिळतील.

**किंमत चार आणे.**

---

२७ सप्टेंबर] भाद्रपद वद्य प्रतिपदेस [१९३१ रोजी

**प्रसिद्ध होईल.**

# पितृपक्ष

अर्थात्

# पिण्डांचे पर्यवसान.

लेखक :—विश्वेश्वर.

श्राद्धे कोणी व कोणाची करावीत, श्राद्धातील अन्धश्रद्धा, पुण्यस्मरणातील पुराणमतवाद, आर्य तत्त्वज्ञानप्रणीत पुनर्जन्म परंतु काकगणांच्या रूपाने प्रतिवर्षी अचूक घिरटया घालणारा पितृगण, वगैरे अनेक विचारणीय मुद्यावर शोधन-प्रकाश ( Search-light ) पाडलेला या छोटयाशा पुस्तकात दिसेल.

# मेलेल्या नाटककारांचे जिवन्त नाटक !

[ उद्या साम्राज्यांतर्गत स्वराज्याची सूत्रे मिळाल्यामुळे मनाला जितके समाधान होणार नाही, त्याच्या दुप्पट आनंद नाट्यप्रयोगातील कथासूत्रे पाहून माझ्या मनाला होत असतो. पूर्वी गटारावरील भिंतीवर फडकलेली नाटकाची रंगीबेरंगी जाहिरात पाहिली की मला आनंद होत असे; पण तोहि आनंद मुंबई म्युनिसिपालिटीने हिरावून घेतला. बाहेरगावी अजून स्वराज्य असल्यामुळे व मुंबईत वर्तमानपत्र असल्यामुळे काळ्या मोठ्या अक्षरातील जाहिरात पाहिली की झालेच उत्पन्न माझ्या अंतःकरणात अरबी समुद्रातील वादळ ! कनवटीला वेळी पैसे नसले तरी नाटक पाहण्याचा माझा शोक मात्र अनावर असे ! मध्यंतरी चांगल्या नाटककंपन्यांचा मुम्बईस मुक्कामच नव्हता. अशा वेळी नाणावलेल्या एका

**'लुटारू संगीत मंडळी'चा**

मुक्काम अचानक येऊन आदळला. एके दिवशी सुप्रसिद्ध देशभक्त **श्रीयुत ठकाजीराव** यांच्या प्रतिभासंपन्न लेखणीतून गिरसप्प्याच्या धबधब्याप्रमाणे कोसळलेले **'संगीत हरामखोर'** नावाचे त्र्यंकी ( त्री + अंकी ) नाटक पाहावयास रात्रौ गेलो. नाटकाला सुरवात झाली. नाटकातील प्रवेशांची गुंतागुंत म्हणजे भारतीय राजकीय चळवळीतील भिन्न मतानुवर्ती पक्षांची मारे बेसुमार धुमश्चक्री ! नाटकातील कथाभाग पाहून मनाला गुदगुल्या होण्याऐवजी घरातील पिसवाचिलटाप्रमाणे नाटक संपेपर्यंत मला सारखे चिमटे बसत होते. अशा तऱ्हेने 'संतापशमन' होण्याच्या ऐवजी ' संतापवर्धन ' करणारा प्रशंसनीय नाट्यप्रयोग पाहून एकदाचा थिएटराबाहेर पडलो, तो घड्याळात १: ४० झाले होते. वाहतुकीचे

त्यावेळी साधन नसल्यामुळे पायीच निघालो; तो घरी पहाटे तीनच्या सुमारास येऊन बिछान्यावर पडलो. कुपरिणामकारक नाटकाची मनावर डागणी बसल्यामुळे बराच वेळ झोप काही लागेना. नंतर पहाटेच्या सुमारास झोपी केव्हा गेलो ते मात्र समजले नाही. नुकताच नाटक पाहून आल्यामुळे डोक्यात नाट्यविचारांचेच सारखे काहूर माजून राहिले. पुढे एक स्वप्न पडले, ते देखील नाट्यविषयासंबंधीच. झाले. झोपी गेल्यानंतर स्वप्न–सिनेमाच्या चित्रपटाला सुरवात झाली:–]

वाट चुकल्यामुळे आड रस्त्याने फिरता फिरता एका गर्द झाडीच्या प्रदेशात शिरलो. थोडा पुढे जातो, तो चांदण्याच्या लख्ख प्रकाशात रमणीय देखाव्याचे एक सरोवर दिसले. चंद्रप्रकाशात चमकणाऱ्या त्या सरोवराच्या नयनमनोहर देखाव्यामुळे श्वापदांची भीति मनाला विशेषशी डचचली नाही. सरोवराच्या आसपास रातविसाव्याचे एखादे निर्भय स्थळ कुठे मिळेल अशा आशेने इकडे तिकडे फिरू लागलो न लागलो तोच चंद्रमा एकाएकी काळोखला; व एक कर्कश गर्जना होऊन आकाशात एक भल्या अवजड मोठ्या वृक्षाच्या विस्ताराएवढा देदिप्यमान प्रकाश पडून त्यातून दिव्यदेहधारी अशी एक व्यक्ति हळूहळू खाली भूतलावर उतरू लागली. त्या व्यक्तीच्या गतीचा रोख माझ्याकडेच आहे अशी माझी खात्री झाल्यानंतर मी त्या ठिकाणाहून धूम ठोकण्याचा विचार करतो तोच ती व्यक्ति माझ्यापुढे येऊन उभी राहिली आणि उद्गारली:–"**हल्लीच्या विषारी नाट्यविषयात आकण्ठ बुडालेल्या मानवाच्या कारट्या, भिऊ नकोस. थांब जरा. ज्या विषयलोलुपतेमुळे तू आज इतका होरपळून निघाला आहेस व ज्या विषयामुळे राष्ट्रकार्याला तू आज अगदी कुचकट ठरला आहेस, त्या नाट्यविषयासंबंधी स्वर्ग–साम्राज्यांतर्गत**

**महाराष्ट्रीय नाटककारांच्या अनाहूत अशा एका खासगी बैठकीचा मी तुला थोडासा वृत्तांत कथन करतो आहे तेवढा नीटपणे ऐकून घे."** त्या व्यक्तीचे वरील उद्गार ऐकून मनातील भीति पार नाहीशी होऊन मला बराच धीर आला. पुढे आम्ही दोघे अगदी सलोख्याच्या नात्याने-पाठच्या भावाप्रमाणे-बाजूला एका मोठ्या दगडीवर जाऊन बसलो. मी आपले निमूटपणे ऐकण्याचे ठरविल्यामुळे त्या दिव्यदेहधारी व्यक्तीने आपला वृत्तांत सांगण्याला आरंभ केला. तो असाः---

परवा दे. भ. **अण्णासाहेब परांजपे** आमच्या लोकामध्ये आल्यापासून आतापर्यंत तिकडे गेलेल्या आद्य नाटककार **सांगली-कर भाव्या**पासून तो काल परवापर्यंत आलेल्या सार्‍या महा-राष्ट्रीय नाटककारांत मोठीच गडबड उडाली. मला वाटते की अण्णासाहेब परांजपे हे जरी एक उत्तम नाटककार होते तरी अनुपमेय देशसेवेचा ओलावा त्यांच्यामध्ये विशेष बाणलेला होता. अशा तर्‍हेचा बहुश्रुत, गुणसंपन्न व कीर्तिमान् गृहस्थ आमच्या लोकात प्रवेश करता झाल्याबरोबर **अण्णा किर्लोस्करा**पासून तो **नाथ-माधव** वगैरेपर्यंतची सारी मण्डळी एके दिवशी तिकडे जमली; आणि दे. भ. **अण्णासाहेब परांजपे** महाराष्ट्राला आपला शेवटला रामराम ठोकून इतक्या लवकर आल्याबद्दल आपापसांत थोडी कुजबुजू लागली.

**बहुतेक जण**:---अण्णासाहेब, इतक्या घाईने येण्यात आपल्या महाराष्ट्राचे आपण भयंकर नुकसान केलेत. आम्ही आपले चुकून घाईने आलो खरे पण त्याला आमचा नाइलाज झाला.

**गडकरी**:---हे बघा, अण्णासाहेब, मी इकडे येण्यापूर्वी मला असे वाटले की राष्ट्रीय प्रगतीला माझ्यासारख्याची नाटके-जरी ती उत्तमातली असली तरी-उपयोगी पडावयाची नाहीत; आपणासारखे

Sensational व Serious वाङ्मय प्रसविणारे नाटककार ज्यावेळी मराठी रंगभूमीवर '**राणा भीमदेवा**'सारखी पात्रे व '**गिलच्यांच्या सुडा**'सारखी नाटके यांचा थैथयाट घालून महाराष्ट्रात देशाभिमानाचे चैतन्य उत्पन्न करतील तेव्हाच आपल्या त्या मायदेशाचे काही कल्याण होईल.

**नाथमाधवः**—अण्णासाहेब, कादंबऱ्या लिहिता लिहिता "**डी. नाथ**" नावाने प्रकाशक झालो व ठेच खाल्ली इतकेच नव्हे तर **गणेश महादेव कंपनीचे** कायमचे काम बाजूला ठेवून चुकून की हो मी नाटके लिहावयाला लागलो व येथे तेथे भटकलो! हा माझा वेडेपणा झाला; पण मनाची ती एक हौस पुरवून घेतली. पुन्हा आपला स्वराज्यावरील कादंबऱ्या लिहावयास लागून माझ्या कीर्तिला आधाररूप त्या कामाकडे वळतो न वळतो तोच इकडचे स्वर्गीय फर्मान सुटून मला माझ्या मर्जीबाहेर येथे यावे लागले. त्या कादबऱ्या पुऱ्या करावयास मला पुनर्जन्म घ्यावा लागेलच; पण नाटकाच्या बाबतीत मात्र संतोष वाटत होता, की काही चिंता नाही; महाराष्ट्रात आपणासारखी मंडळी बरीच आहेत, धरतील ती मराठी रंगभूमीला सावरून. पण पहातो तो आपणहि आलात इकडे. आपणासारखी आणखी कुणि मण्डळी न येवोत म्हणजे झाले. आता आपल्या सान्निध्याला सोडून श्री. **वीरकरा**करिता पुनर्जन्म कसा घ्यावयाचा?

( इतक्यांत **सांगलीकर भावे** पुढे येऊन– )

समस्त मंडळींनो, अशा तऱ्हेच्या वादात कालक्षेप करून पूर्वी घाटत असलेले आपले उद्दिष्ट सफल होईलसे मला नाही दिसत. या ठिकाणी आपण आज जे एकत्र जमलो आहोत, ते नाटककार या पेशाने. शिवाय आपणाला आज जी काही चर्चा करावयाची

आहे तीहि नाट्यविषयासंबंधीची. माझ्यावेळी महाराष्ट्रात **ताक-डथोम्-कंट्री-कंपन्या** होत्या आणि त्यांचे प्रयोग म्हणजे दशावतारी आख्याने.* तो काळ काही निराळा होता. त्यानंतर आपल्या **सोकर बापूजी त्रिलोकेकरा**नी व नंतर **अण्णासाहेब किर्लोस्करा**नी मराठी रंगभूमीची दिशा बदलून नाटकाना वळणहि नवीन तऱ्हेचे लाविले. तेव्हा, मला वाटते आजच्या आपल्या या बैठकीच्या प्रसंगी **अण्णासाहेब किर्लोस्करानाच** अध्यक्षस्थानी बसवून आपल्या या नव लोकात एखादा उत्तम पण नवीन असा नाट्यप्रयोग करण्याचं आपण सर्वानुमते ठरवावे, अशी माझी फार इच्छा आहे. शिवाय आपल्या शेजारी **गणपतराव जोशी, केशवराव भोसले, पाटणकर, जोगळेकर, भाऊराव,** वगैरेसारखा उत्तम नटवर्गहि तयार आहे. आपणा सर्वांच्या परिश्रमाने नवे नाटक रचून तयार झाल्यावर ते बसवितेवेळी तालमीची सूत्रे आपल्या **देवलमास्तरा**-पाशी द्यावीत, अशी माझी सूचना आहे.

**गडकरी**:—छेः ! हे नाही बुवा आपल्याला पसंत. देवल मास्त-रांच्या हाती तालमीची सूत्रे मुळीच नकोत. त्यांच्या राज्यात नाटक प्रयोग होऊ लागले म्हणजे सूत्रधार रहावयाचा स्टेजवर आणि नटी जावयाची देवलांच्या मागोमाग ! शिवाय आपले नाटक एखाद्या कंपनीकडून नीट व्हावयाला लागले की देवल मास्तरानी त्या कंप-नीतील प्रमुख नट अचानक फोडलेच म्हणून समजावे ! अशा तऱ्हेची देवलांची नित्याची—

**भावे**:—थांबा हो गडकरी जरा. मध्येच नका जाऊ असे मूळ विषयाबाहेर. लिहिण्यात देखील तुम्हाला असली ही जन्मप्राप्त खोड आहे.

---

*दशावतारी आख्यानाची पूर्वी जी नाटके होत, त्याचे वर्णन शेवटी **परिशिष्टात** पहाणे.

**गडकरीः**–अगदी एकीकडे अस्पृश्याप्रमाणे कोपऱ्यात बसणारी ती कोण मंडळी? लांब का बसली इतकी?

**अण्णा कि.**ः–मघाच त्यानी मला खासगीरीत्या कळविले आहे, की आमच्या नावाचा अधिक गवगवा नको आहे आपल्या या बैठकीत. कारण, हल्ली सुधारलेल्या मराठी रंगभूमीचा पूर्ण व ताजा अनुभव घेऊन आलेल्या आपणासारख्या बहुरंगी मंडळीच्या विषय-प्रतिपादनात आमच्या जुनाट विचारांचे विरजण नको आहे म्हणून म्हणाली ती मंडळी!

**नाथः**–जवळ नसल्यामुळे ती नीट दिसत नाहीत; म्हणून म्हणतो त्यांचा काही परिचय करून द्याल की आमच्याशी.

**अण्णा कि.**ः–नाट्यकलाभिज्ञ **शंकर मोरो रानडे**, 'सुमति'कर्ते **शंकर विष्णु कुळकर्णी**, बी. ए., संगीत शाकुंतल व 'शाकुंतल'. 'वेणीसंहार,' 'रत्नावली,' 'मृच्छकटिक,' इ. नाटकांचे भाषांतर कर्ते **वासुदेव नारायण डोंगरे**, 'श्रीतुकाराम' कर्ते **शिरवळकर, कानिटकर, बरवे**, 'भीमसिंग,' 'पद्मिनी,' 'जठरोद्वाह' ही गद्य व 'चंद्रसेना' 'चंद्रहास' ही संगीत इ.नाटकांचे कर्ते **पुरुषोत्तम भास्कर डोंगरे, सोकर बापूजी त्रिलोकेकर** हे संगीत नाटकांचे मूळ उत्पादक असून, तो मान काही पक्षांध मंडळी मला देतात, पण त्यांची ती सपशेल चूक आहे. या शिवाय आणखी एक व्यक्ति म्हणजे मराठी रंगभूमीवर 'सभ्य' धांगडधिंगा घालणारी नाटके ज्यांच्या लेखणीतून सारखी प्रसवली ते **माधवराव पाटणकर** होत.

**गडकरीः**–मला आताच कापरे भरू लागले! या पाटणकरी नाटकानी–किंबहुना तमाशानी–मराठी रंगभूमीवर मोठे बण्ड केले आहे. '**हा मदंगा**' सारखे झगडे व '**हाणा हाण दाणा दाण**' सारखी मोठी दंडेली केली आहे. अलिकडील कविता–विशेष संगीत नाटकात तिची दुर्दशा झाली आहे. '**कवींचा कारखाना**' या

माझ्या लेखापेक्षा '**कविता देवीची स्वातंत्रप्रीति**' हा 'सुधारक' पत्रातील ता. १५-८-१८९८ चा लेख पहा म्हणजे आपणास या **पाटणकरी कंपूचे रहस्य** कळून येईल. यांच्या त्या नीरस, अश्लील व मजूरवर्गप्रिय नाटकानी सारी लोकाभिरुचि बिघडविली. या आपल्या अण्णासाहेब किर्लोस्करांच्या उत्तम कंपनीवरहि त्याचा अनिष्ट परिणाम झाला. हा पाटणकर कंपू म्हणजे विटाळयाच्या कवितेची जंगी फॅक्टरी ! मला वाटतं, बरे झाले, आपण होऊनच ते दूर बसले. पण काही झाले तरी ही मंडळी आपलीच आहे; या बैठकीत भाग घेण्याचा त्यांचा जन्मसिद्ध हक्क आहे !

( इतक्यात **पाटणकर, अण्णा मार्तंड जोशी, नेवाळकर, बरवे, कानिटकर, शंकर मोरो रानडे,** वगैरे मंडळी उठून म्हणतात ) नाटक लिहून ते बसविण्यासंबंधीची भाऊयांची सूचना मात्र खाशी आहे. पण तिचा विचार आपण मतैक्याने केला म्हणजे ठीक होईल. शिवाय आमची एक अलग सूचना आहे. ती ही की महाराष्ट्रात **नाट्यसंमेलनाचे** आज जे **निव्वळ फार्स** होताहेत त्याना पायबंद घालण्याची आपण काही तरी युक्ति काढिली पाहिजे; आणि त्या संबंधीचे काही ठराव आजच्या या बैठकीत पास करून घेऊन ते संमेलनाच्या चिटणिसाकडे रवाना करावयास पाहिजेत.

**गडकरी**:-मी म्हणतो या ठिकाणी नाट्यप्रयोग करण्यासाठी आपण आपल्या जिवाचा आटारेटा करण्यापेक्षा अशा तऱ्हेची काही विधायक कामगिरी केल्यास मराठी रंगभूमीचे पांग फेडलेसे होईल. नेवाळकरादिकांच्या या उपयुक्त सूचनेला माझे पूर्ण अनुमोदन आहे. वा ! हा पाटणकरी कंपू जोरात आलासा दिसतो ! छान !

**नाथ**:-गडकऱ्यांच्या या अनुमोदनाला माझी संपूर्ण पुष्टि आहे.

**देवल**:-नाथांच्या वरील पुष्टीला माझा पूर्ण टेकू आहे.

**नेवाळकरादि**–शिवाय मघा सांगितलेले ठराव तयार होण्या-पूर्वी आपल्या बरोबरीच्या त्यावेळच्या आपल्या व्यवसायबंधूंचा आपणाला या कामी योग्य सल्ला मिळविणे आवश्यक आहे.

**अण्णा मार्तंड**–‘ जुने ते सोने ’ आमच्या वेळच्या मण्डळीचा सल्ला आपण घेतलाच पाहिजे.

**नाथः**–मित्र हो, ते सारे काही कबूल. पण तुमच्या आमच्या बरोबरीची ती श्रीयुत मण्डळी आपणाला या वेळी येऊन मिळणार कशी ? ती तर कैलासनिवासविन्मुख आहेत !

**गडकरीः**–नाथ, त्यांचा हा असहकार आम्हाला नाही पसंत. ते काही नाही. थोड्या दिवसांच्या अवधीत ती मण्डळी आपल्याला येऊन मिळालीच पाहिजे. आणि स्वखुशीने ती मण्डळी जर का लवकर आली नाही, तर माझ्या ‘सुधाकरा’च्या बोकांडी ‘तळिरामा’-सारखा जिवंत समंध मी जसा लावला आणि ‘ सिंधू’सारख्या एका आर्य स्त्रीला दळावयाला लावून, अखेर तिच्या संसाराचा जसा धुव्वा उडवून दिला, तशा तऱ्हेची इकडील नव लोकात मी सनदशीर चळवळ करून तुमच्या त्या श्रीयुताना उपरणी झाडीत लगबगीने या स्वर्गात यावयाला लावीन म्हटले म्हणजे याचा अर्थ काही ? अहो राजश्री, थोडा दूरवर विचार करून पहा ? आम्ही आपली आयुरेषा कमी करून घाईने डबघाई करून एकदाचे जे इकडे आलो ते सारेजण मूर्ख होतो की काय ? **‘ जगण्या सारखे जवळ काही असते, तोपर्यंतच मरण्यात मौज असते ! ’** राव–ह्या तत्त्वानेच आम्ही येथे इतक्या अल्पवयात आलो.

**देवलः**—ओः ह्लोः ! गडकरी मास्तरांचे हे Argument–आय् मीन् विधान व सूचना–अगदी योग्य असून ते सोन्याहून–माझ्या ‘ कांचन भटा ’ पेक्षाहि मौल्यवान् आहे !

**अण्णा किर्लोस्कर**:—मित्र हो, असा काहीच्याबाहीच त्रागा करून चालावयाचे नाही. मृत्युलोकामध्ये आपली ती मंडळी कुठे आहेत, त्यांचे कोणते उद्दिष्ट कार्य कशा प्रकारे चालले आहे, वगैरे गोष्टींचा खुलासा आपण इथे नुकत्या आलेल्या आपल्या या अण्णापासून करून घेऊ म्हणजे हा वाद मिटेल व पुढे योग्य तो विचार करणे सुलभ होईल. '**रचिला ज्याचा पाया त्याची बरी उभारणी झाली**' अशा धोरणानेच आरंभ नीट केला म्हणजे ठीक होईल. कारण, आपण महाराष्ट्रीय लोक म्हणजे 'आरंभशूराः खलु दक्षिणात्याः' ! तेव्हा इथल्या या कैलासातील वातावरणात आपण आता नवविचारानेच वागले पाहिजे. नाही तर सगळाच गोंधळ उडून शेजारील नटवर्गात तर आपल्या फजितीला पारावार राहणार नाही. बरे तर मित्र हो, इकडे आलेल्या आपणापैकी आपले ते **हरिभाऊ आपटे**, **आगरकर**, प्रो. **केळकर**, इत्यादि कुठे आहेत ? ही मण्डळी आपल्या या बैठकीला का बरे नाही आली ?

**देवल**:—अण्णासाहेब, काही विषयांचा स्वाध्याय करण्यासाठी ती मंडळी आपापल्या मठीत निमूटपणे बसली आहे.

**अण्णासाहेब किर्लोस्कर**:—होय का ? बरे, **हरिभाऊ** अशा कोणत्या नवीन विषयावर आपली मगजफोड करीत बसले आहेत आज ?

**देवल**:—तरुण पिढीवर वाईट परिणाम होताहेत म्हणून प्रणय-कथानी गुंफल्या जाणाऱ्या हल्लीच्या **फद्या-ढब्बू मालांचा** खरपूस समचार घेण्याच्या योजनेत गुंतले आहेत ते. आणि संभाजीच्या चरित्रभागावर रचण्यात आलेल्या साऱ्या नाटक कादंबऱ्यांची झडती घेऊन संभाजीने केलेल्या आत्मयज्ञाचे चित्र रेखाटून हिंदुसंघटणाच्या दृष्टीने शिवाजीपेक्षा संभाजीचेच उत्सव सार्वत्रिक

झाले पाहिजेत, अशा तऱ्हेचा विचार चालला आहे त्यांचा. थोड्याशा अवकाशात येतील ते इकडे.

**गडकरी**:—अरे रे! अण्णा, अहो अण्णा, माझ्या हातून एक अक्षम्य चूक झाली की हो! **"राजा म्हणजे जगाचा उपभोगशून्य स्वामी! राज्य-उपभोग म्हणजे राजसंन्यास!"** केवळ या सूत्रासाठी मी संभाजीच्या चरित्रावर ऐतिहासिक नाटक म्हणून 'राजसंन्यास' रचिले. इतिहासमर्मज्ञ आमच्या हरिभाऊनी ज्याअर्थी आपली लेखणी उचलली आहे त्याअर्थी ते माझ्या नाटकाची रेवडी उडविल्याविना रहावयाचे नाहीत. पण मी तरी त्याना दोष काय म्हणून द्यावा? हाय! *(ओक्साबोक्शी रडू लागतात.)*

**नाथ**:––मास्तर, असे भागुबाईसारखे रडण्यात काय बरे हशील? होताहे ते झालेच पाहिजे. मी आपल्या 'मराठ्यांच्या आत्मयज्ञा'-बद्दल रडतो आहे का? नाही. आणि हे बघा, 'राजसंन्यास' नाटकाच्या अशा तऱ्हेने होणाऱ्या केविलवाण्या शेवटाबद्दल तुम्ही आपल्या 'राजहंस माझा निजला' या काव्याच्या तोडीचे शोकरसपूर्ण व सेन्सेशनल् असे एक सुनीत (Sonnet) रचावे असे मला वाटते.

**अण्णा कि०**:—बरे **आगरकर**––

**देवल**:––ते का? सांगतो. नुकतेच अमेरिकेहून '**Psychology of Sex**' या विषयावर ग्रन्थ मागवून त्यांचा तुलनात्मक अभ्यास करण्यात ते गुंतले आहेत. हिन्दु संस्कृति, समाजशास्त्र, यांच्या स्वच्छ दुर्बिणीतून हिन्दुविवाहसंस्थेतील घाण बाहेर काढण्याचेहि म्हणाले ते.

**अण्णा कि०**:––हा काय बुवा त्यांचा नवीन प्रकार? 'हॅम्लेट'-सारखी भाषांतरित नाटके लिहिण्याचे सोडून देऊन, किंवा

समाजसुधारणेवर सडेतोड निबंध लिहिण्याचे टाकून हे नवीन बंड काय आरंभिले आहे त्यानी ?

**प्रो० परांजपेः**—त्यांची ती दिशा आजच्या बदललेल्या परिस्थितीच्या दृष्टीने योग्यच आहे. आपल्याकडे महाराष्ट्राला किंबहुना अखिल हिन्दुसमाजाला '**Sexology**' या विषयाची जाणीव करून देणे अत्यंत जरूरीचे आहे. 'The World League for Sexual Reform' च्या अस्तित्वाखाली नुकत्या भरलेल्या परिषदेपुढे सुप्रसिद्ध इंग्रज नाटककार **जॉर्ज बर्नार्ड शॉ** यानी मैथुन–प्रमाणाच्या गूढ प्रश्नाबद्दल आपले जे स्पष्ट विचार प्रदर्शित केले आहेत, ते अत्यंत मननीय आहेत. करिता या विषयाकडे महाराष्ट्रात कुणाचे तरी लक्ष लागणे आज अत्यावश्यक झाले आहे. तेव्हा आमच्या आगरकरांचा प्रस्तुतचा प्रयत्न प्रशंसनीय आहे.

**गडकरीः**––( स्वगत ) कमाल आहे बुवा या पुणेरी मंडळीपुढे. केव्हा कोणती टूम काढून लोकमान्यता मिळवितील याचा काही नेमच नाही ! साऱ्या महाराष्ट्राला पुरून उरले आहेत गुलामाचे !

**देवलः**––शिवाय नाटकांच्या व नाटकमंडळ्यांच्या बाबतीत **आगरकर** थोडक्यातच म्हणाले की "आह्मा महाराष्ट्रीय नाटककारांच्यापुढे 'जगावें की मरावें ?' असा माझ्या 'हॅम्लेट'च्या प्रश्नासारखा प्रश्न उभा राहिला आहे. मला आता नाटके लिहिणे नको आहे. आणि लिहावयाचे झालेच, तर काही दिवसापूर्वी आखणी करून ठेविलेले '**कुमारिकेची सून**' हे नाटक लिहून हिंदुसमाजातील नीतिमत्तेचा पोकळ भोपळा भर चव्हाट्यावर फोडीन." नंतर मी प्रोफेसर **केळकरांच्या** मठीकडे वळलो. बोलता बोलता प्रोफेसरसाहेब एकदम आवेशाने ह्मणाले–"इंग्रजी नाटकांची भाषांतरे कशी करावीत, त्याना मराठी पद्धतीचा पेहराव

कसा चढवावा, वगैरे दृष्टीने मी ‘ त्राटिका ’ नाटक लिहिले. पण अलीकडे त्या **बलवंत संगीत मण्डळीने** माझ्या त्या नाटकाला संगीताचे बेढब स्वरूप देण्यात नाटकाचे मूळ स्वारस्य पार घालविले आहे. मला जर पुनश्च तिकडे जाता आले असते तर **कोल्हटकराना** प्रथम ‘ चौदावे रत्न ’ चांगलेच दाखविले असते. खरोखरच मला या प्रकारांचा अगदी तिटकारा आला आहे. **सांगलीकर भाव्याना** मी सुचवितो की आपण सर्व मिळून पूर्वीच्या तुमच्या त्या ‘ **अललल** डुऽऽर्’च्या नाटकानाच पुढे आणून लोकादरास पात्र करू या. त्याशिवाय मराठी रंगभूमीचे हलीचे बीभत्स स्वरूप पालटावयाचे नाही. वाटेल तो बेजबाबदार लेखक काही तरी खरडून नाटककार म्हणून कंपनीकडे धावतो आहे. गलिच्छ नाटके रंगभूमीवर अव्याहत आल्यामुळे, मराठी रंगभूमि म्हणजे ललितकलेतील एक कुण्टणखानाच बनली आहे. कोणावर कोणाचा दाब म्हणून राहिलेला नाही. तेव्हा अशा प्रसंगी **भाव्यांच्या** त्या दशावतारी खेळानाच पुढे आणल्याशिवाय, या चवचाल मण्डळींच्या वाह्यात हालचाली बंद पडावयाच्या नाहीत. करतोच प्रयत्न !” ( देवलांच्या तोंडचे प्रो. केळकरांचे वरील उद्गार ऐकून सारी मंडळी चकित होते. )

**गडकरी**:—देवल मास्तर, ही काय बुवा ताजी बातमी आणलीत तुम्ही ? मला मघाच थोडी शंका आली की वरील तिघेजण आजच्या बैठकीत वेळेवर आले नाहीत, त्याअर्थी त्यांच्या न येण्याचे हे काही तरी गौडबंगाल असावे खास. आम्हा मंडळींवर ही संक्रांतच आली आहे म्हणायची ! अशाने माझ्या उच्च कोटीतील पुण्यप्रभावशील नाटकांचे संन्यासबंधन एकाच वेळी नष्ट होईल; आणि साराच वेड्यांचा बाजार भरेल ! माझ्या रिकामपणच्या कामगिरीलाहि अवसर मिळावयाचा नाही. मास्तर,

आह्मासारख्यांच्या नाटकावर दशावतारी नाट्यप्रयोगांचे हे एक अरिष्टच कोसळणार ! छेः छेः ! असे असेल तर पक्षभेदाचा सवता सुभा निर्माण करून केंव्हाहि प्रतिकार हा केलाच पाहिजे. आमच्या इथल्या कंपूतील असल्या पुराणमतवादी शिष्टांचा समाचार घेण्यास मला माझ्या त्या जातभाई श्री. **ठाकऱ्यालाच** आमंत्रित केले पाहिजे. बिचारा नुकताच ग्रहदशेच्या फेऱ्यातून मोकळा होऊ लागला आहे. बोलावतोच त्याला; आणि त्याच्या त्या 'कोदंडाचा टणत्कार' करवून करतोच या मंडळीवर एकदाचा वज्रप्रहार, की पुन्हा असल्या खुळचट विचाराना थारा नाही द्यायचे गुलाम आपल्या अंतःकरणात ! ही काय दिलजमाई की दिलजखम ?

**प्रो. परांजपे**:–अहो गडकरी, तुमच्या त्या ठाकऱ्याला इथे बोलावून **'भारत-इतिहास-संशोधक-मंडळा'**ची ब्राह्मणी बिंगे बाहेर काढावयाची आहेत, की ब्राह्मणांच्या भिक्षुकशाहीवर शिव्यांचा भडिमार करावयाचा आहे, की पुराणमतवादी हिंदूंच्या मनोवृत्तींचे वाभाडे काढावयाचे आहेत ? त्याने लिहिलेल्या 'सीताशुद्धि' नाटकाचा प्रयोग संध्याकाळी रंगभूमीवर लागणार तोच स्वारी एकाएकी बिथरली. झाले, प्रयोग होण्याचे बोंबलले व इथून तिथून साराच बेरंग झाला. इतका तो दुर्वासवृत्तीचा आहे ! अहो, त्याचे कधी तरी कुणाशी सरळ पटले आहे ? अँ हः हुंडा घेण्याने लिलाव झालेल्या आपल्या जातभाईंचीच वरात गाढवावर काढल्यामुळे साऱ्या जातभाईंच्या खऱ्या सहानुभूतीला बिचारा तो आचवला मात्र. पुण्यात, सदाशिव पेठेत, ब्रह्मवृक्षाजवळ बसून **'लोकहितवादाची'** पण '**स्वतंत्र मतवादाची**' **बासरी** वाजवायला लागताच पुण्याच्या फरासखान्यातील सारे '**कोब्रा**' डुलण्याऐवजी आपले विषारी फूत्कार सोडू लागले. भर भूदेवांच्या वस्तीत राहून त्यांचीच मानगुटी वाकवायला गेला, तोच त्याच्या दैवाचा सतारा एकाएकी

फिरला ! ब्राह्मणांचा—त्या वेदोनारायणांचा-- तळमळून दिलेला शाप त्याला सपशेल भोवला, दुसरे काय ?

**खरेशास्त्री**:—अध्यक्षमहाराज व सद्गृहस्थहो, वयाच्या वा ज्ञानाच्या अधिकाराने नव्हे, तर केवळ मत्सररहित भावाने दोन शब्द मला बोलावेसे वाटतात. वास्तविक या बैठकीला उपस्थित राहून निमूटपणे ऐकण्याचेच ठरविले होते मी; पण '**भारत-इतिहास-संशोधक मंडळा**'चा उल्लेख झाला आहे, त्याअर्थी मी ठासून म्हणतो, की आपल्याच कंपूतील श्रीयुताना प्राधान्य देणाऱ्या 'भा. इ. सं. मण्डळा' ला आमच्या श्रीयुत **ठाकऱ्या**नी सज्जड थप्पड देऊन चारी मुंड्या चीत केले हे एकार्थी योग्यच झाले. आपल्या समाजाला तेवढे श्रेष्ठ लेखून बाकीच्या समाजाना नीच लेखणाऱ्या महाराष्ट्राच्या मनोवृत्तीला 'कोदण्डाच्या टणत्कारा' ने जखमी केले, हे—मी म्हणतो—छान केले. पण यामुळे श्री. ठाकऱ्यांच्या व्यवसायावर मात्र मोठा विपरीत परिणाम घडला. इतिहास, शास्त्र, सत्य आणि नीति यांच्या भांडवलावर व्याजबट्ट्याने (?) समाजकार्य करणाऱ्या व्यक्तींचे हाल झाले आहेत, त्यांचा अनन्वित छळ झाला आहे, शनिदेवाच्या वक्र-दृष्टि-शराने त्या व्यक्ती घायाळ झाल्या आहेत—हा जर जगाचा सिद्धांत--तर आमचे श्री. ठाकरे तरी अपवाद कसे ठरतील ? त्यांच्या सत्यप्रतिपादनाचा झब्बुशाहीकडून आज जरी अर्थविपर्यास झाला असला, तरी पाव-अर्धशतकाच्या कालावधिनंतर त्यांच्या लिखाणातील प्रत्येक शब्दाचा खरेपणा महाराष्ट्राला पटेल, अशी मला खात्री आहे. झोपा घेत असलेल्या समाजाच्या मानगुटीला धरून त्याला दोन पावले पुढे नेणाऱ्या प्रत्येक कदरबाज समाजव्यक्तीवर शरसंधान धरणे हा बहुजनसमाजाचा प्रकृति-स्वभाव आहे; त्याला काही इलाज नाही. आपणा मंडळीस आणखी एक गोष्ट सांगावयाची ती ही, की

माझे मुख्य उद्दिष्ट म्हणजे ‘ **ऐतिहासिक–लेख–संग्रह** ’ प्रसिद्ध करण्याचे; परंतु माझ्या काही विद्वान् मित्रांच्या आग्रहावरून ‘ गुणोत्कर्ष ’ ‘ तारामंडळ ’, ‘ शिवसंभव ’, ‘ चित्रवंचना ’, ‘ कृष्णकांचन ’, वगैरे नाटके मी लिहिली. नाटकमंडळ्याबरोबर होणारे, माझ्या नाटकासंबंधीचे, व्यवहार सडेतोड व कडक शिस्तीचे असल्यामुळे त्यांच्या प्रभावळीत ‘ सुप्रसिद्ध नाटककार ’ म्हणून केव्हांहि मी झळकलो नाही. हांजीखोरपणाचा मला पहिल्यापासूनच तिटकारा. त्यामुळे माझे कधी कोणाशी नीटसे पटले नाही. केवळ स्वानुभव म्हणून हे इतके सांगितले. आपण कर्तबगार मंडळींनी अवांतर विषयांचा नसता खल या बैठकीत न करता काही विधायक कार्याची मुहूर्तमेढ रोवावीत अशी माझी आपणा सर्वांस नम्र सूचना आहे. अयोग्य मुद्यावर अकारण मगजफोड करीत बसाल, तर या बैठकीच्या कार्यात यश न येता, अखेर आपणा सर्वांना प्रायश्चित्त म्हणून सळो का पळोसे होईल. आपापल्या मठी गाठता गाठता आपल्या पंचप्राणावर येऊन बेतेल !

**गडकरीः**–(एकीकडे) आमचे हे शास्त्रीबुवा म्हणजे धुतल्या तांदळाप्रमाणे चोखे दिसतात! यांचा करारी स्वभाव जरा सुद्धा वितळावयाचा नाही. म्हातारा बोलतोयच मुळी स्पष्ट आणि खरे, तिथे करणार तरी काय आम्ही सारे ? असल्या व्यक्तीला तोंड देणे मोठे धाडसच !

**देवलः**–हे बघा, जातीचा प्रश्न हवा आहे कशाला इथे ?

**प्रो. परांजपेः**–आमच्या या **गडकऱ्यांना** ही थोडीशी जन्मखोडच असावीशी वाटते. कारण, मूळ नाट्यकथासूत्राशी काही एक संबंध नसता त्यानी आपल्या ‘ **राजसंन्यास** ’ नाटकात ‘ जिवाजी ’ नावाचे पात्र आणून कायस्थी कलमाचे कसोशीने वर्णन

केले आहे. नवमतवादी लेखकाच्या वाङ्मयाला यामुळे हे थोडेसे गालबोटच लागले आहे. शिवाय, जातिभेदाच्या प्रश्नानी महाराष्ट्राला–नव्हे साऱ्या हिन्दुराष्ट्राला–राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या बाबतीत किंकर्तव्यमूढ केले आहे. मी म्हणतो निदान भाषापरत्वे तरी जातिभेद नष्ट होणे आज अत्यावश्यक झाले आहे.

**देवलः**–हा प्रश्न समाजशास्त्रकोविदांचा आहे. आपणाला या प्रश्नाशी तूर्त काही एक कर्तव्य नाही.

**गडकरीः**—(लांब सुस्कारा सोडतात.) बरे, ते राहू द्या. नाही बोलावीत त्याला. पण प्रो. **केळकरांची** योजना टळेल, अशी काही तरी युक्ति काढा; न जमल्यास विरोध करा; सत्याग्रह करा; प्रतिकाराच्या मतप्रसारार्थ एखादे दैनिक-साप्ताहिक-पाक्षिक काढा; काय वाटेल ते करा; पण रंगभूमीवरील ते अरिष्ट टाळा आधी. ती पहा, आलीच ती मण्डळी इकडे.

[ इतक्यात **हरिभाऊ, आगरकर** व प्रो. **केळकर** लगबगीने येतात. बाकीची मण्डळी चपापून स्तब्ध बसते. ]

**देवल** :—अण्णा, मघा म्हणत होतो ती मण्डळी तर आली. पण अजूनपावतो **वासुदेवराव डोंगरे** यांचा काही पत्ताच नाही.

**अण्णा कि०**:–हो, त्यांच्याबद्दल मला मघाच कोणी सांगितले, की महाराष्ट्रात असता त्यानी आपला सवतासुभा निर्माण केला व नंतर काही कालाने त्यांचे डोकेच फिरल्यासारखे होऊन, त्या वेडाच्या भरात त्यानी आपले एखाद्या सन्याशाप्रमाणे मुण्डण करून घेतले; व खाकेत एक झोळी अडकावून त्यात शेदोनशे विड्या व बऱ्याचशा भरल्या रिकाम्या आगकाड्यांच्या पेट्या याचा भरणा ठेवून रस्त्यातून मोकाट फिरत नाटक कंपन्यांची ठिकाणे ते हुडकीत असत ! पुढे असे समजले, की **नाट्यकलाप्रवर्तक नाटकमण्डळीच्या** पूर्वीच्या

मालकत्रयीकडून इ. स. १८९२-९३चे सुमारास या स्वारीचा अंत्यविधि उरकला गेला. असले माथेफिरू असून देखील आजच्या बैठकीत त्यांचा शिरकाव न होईल तेवढा बरा. आणि मला वाटते की जी काही कैलासवासी मण्डळी आपणाला आज इकडे आढळत नसतील, त्यांचा विषयच आपण अजिबात सोडून दिला पाहिजे.

**देवल**:-अण्णा, हे नाथ म्हणतात की डोंगरे नुकतेच येऊन, त्या कोपऱ्यातील मंडळीच्या घोळक्यात गुपचुप बसलेत.

**अण्णा कि०**:-असो,माझी आपणा सर्व मण्डळीला अशी एक नम्र विनंति आहे-मघा **विष्णुपंत भाव्यानी** दर्शविलेच की आजच्या या खास बैठकीचे अध्यक्षस्थान मी स्वीकारावे; पण आजची वस्तुस्थिति अशी आहे, की या ठिकाणी देवदेवतांचे साम्राज्य आहे. अशा या देवदेवतानादेखील ज्या आमच्या **भाव्यानी** महाराष्ट्र रंगभूमीवर आपल्या दशावतारी खेळातून नाचविण्याचा आदिसन्मान मिळविला, त्या आपल्या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, अनुभववृद्ध आद्य नाटकाचार्य भाव्यानाच आजचे अध्यक्षस्थान देणे योग्य दिसेल, अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

**सर्व जण**:-वाहवा !-आनंद आहे ! ! अण्णांचे हे सौजन्य व परगुण-ग्राहकता पाहून आम्हाला मनस्वी रोमांचित समाधान होत आहे ! ह्या त्यांच्या सूचनेला आम्ही आपली एक मताने मंजुरी देत आहोत. [ सारख्या टाळ्या. ]

**गडकरी**:-मघा मी म्हटले होते की अण्णा, देवल, यांच्या वेळची काही मण्डळी आपल्या या नव्या प्रदेशात आलेली नाही. ती बेटी अजून महाराष्ट्रातच इतस्ततः बागडते आहे. करिता त्यांच्यासंबंधीचा वृत्तांत कळणे जरूर आहे. मला वाटते आपले **अण्णासाहेब परांजपे** सांगतील तो आपणाला.

**प्रो. परांजपे**:—हो, ती हकीकत मी केव्हाच सांगून टाकणार होतो. पण आपण बहुतेक मण्डळींनी अकारण मतमतांतराचा बदसूरी गलबला केल्यामुळे माझे सांगण्याचे कुतूहल तसेच गुलदस्तात राहून गेले.

[ टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात **सांगलीकर भावे** अध्यक्ष-स्थानारूढ होऊन ]

**भावे**:—आता कोण कोण मण्डळी राहिली आहेत—येऊ द्या यादी पुढे.

**देवल**:—अध्यक्ष महाराज, सन्मित्र हो, मला वाटते की बाजार-बुणग्या नाट्यलेखकांच्या रिक्रूटभरतीने यादी फुगविण्यापेक्षा व त्यांच्या अकाली येण्याची अपेक्षा करण्यापेक्षा निर्ढावलेल्या व महाराष्ट्राला आदरणीय असलेल्या काही निवडक, कर्तबगार व सहृदयी नाटककारांच्या इकडे येण्याची अपेक्षा करणेच योग्य होईल.

**प्रो. परांजपे**:—ज्यावेळी मी आपला गाशा गुंडाळून इकडे येण्याच्या तयारीला लागलो, त्यावेळी माझ्या वयाच्या माझ्या नाट्यव्यवसायबंधूंची मला आठवण झाली. इतक्यात माझ्याजवळ बसलेल्या काही मंडळींच्या तोंडून **पाठारे, तात्यासाहेब कोल्हट-कर, खाडिलकर, व अप्पा टिपणीस** यांच्यासंबंधीचा खास वृत्तांत कळला; पण तो ऐकून एका परीने मनाला वाईट वाटले !

**गडकरी**:—पण हे सारे श्रीयुत या घडीला महाराष्ट्राच्या कबु-तरखान्यात सुखरूप आहेत ना ?

**प्रो. परांजपे**:—अरे रे ! त्यांची आजची स्थिति फारच अनुकंपनीय आहे. बोल्शेविझम्‌विषयी **'नवाकाळा'**त अग्रलेख लिहिल्याबद्दल आमच्या **काका खाडीलकरां**ना तुरुंगाच्या दारात जावे लागले ! त्या आपत्तीतून ते नुकतेच सुटले आहेत !

**देवल**:—ते तुरुंगाच्या पलीकडच्याहि एखाद्या तुरुंगात जरी ठेवले गेले, तरी तुरुंगातच **गंधर्व नाटकमण्डळी**करिता एखादे खास नाटक लिहून हजारो रुपये हबकण्याचा त्यांचा तो पुणेरी मोह मात्र आवरावयाचा नाही. असो. काही असले तरी राष्ट्रीयदृष्ट्या त्यांचा दर्जा, रोज नवीन तऱ्हेने पगडी पालट करणाऱ्या दक्षिणी बाजारबुणग्या दे.भ.पेक्षा, उच्च आहे,संस्मरणीय आहे,आदर्शवत् आहे.

**प्रो. परांजपे**:—**तात्यासाहेबां**ची साहित्यबत्तीशी मात्र आता हालू लागली आहे. आज दोन वर्षे झाली, ते 'HIGH BLOOD PRESSURE' ने आजारी असून त्यांच्या डोळ्यानाहि किंचित् अंधत्व आले आहे.*

**गडकरी**:-मग, एखादे 'पुनर्परिवर्तन' नाटक लिहिण्याच्या विचारात तर ते नाहीत ना?

**प्रो. परांजपे**:-छेः काही नाही. निवडक पत्रव्यवहाराशिवाय त्यांचे लेखन वाचन उपरिनिर्दिष्ट व्याधीमुळे अजिबात बंद पडले. नवीन नाटके लिहून ती कंपन्याकडे घेऊन जाण्याचा मोह त्यानी मागेच आवरला. न आवरून करतील काय ?—कारण, त्यांच्यासारख्या सुप्रसिद्ध नाट्याचार्याला देखील नाटके व नाटक-कंपन्या यांच्या बाबतीत अगदी कटु अनुभव येऊ लागला ! श्री. **पाठाऱ्या**विषयी म्हणाल, तर ते बिचारे आज वर्षभर 'NON-PARALYTIC STROKE' ने आंथरुणाला खिळून आहेत. मराठी रंगभूमीवर त्यांच्या एका '**संभाजी**' नाटकाने जितका म्हणून लौकिक मिळविला—

**नाथ**:-( मध्येच उठून ) थांबा अण्णासाहेब; त्यांच्यासंबंधीची सविस्तर माहिती मलाच अधिक ठाऊक आहे. आपल्या परवानगीने

* आता प्रकृति सुधारली आहे.—लेखक.

ती मी या सर्व मण्डळीला सांगतो. पूर्वी मी दादर (मुंबई) मुक्कामी रहात असता,माझ्या रांगत्या लेखणीला,माझ्या पहिल्या एक दोन कादंबऱ्यात, सावरून धरिले; आणि वेळोवेळी आपुलकीच्या भावाने वाङ्मयात्मक अशा बऱ्याच सूचनाहि मला दिल्या. अशा तऱ्हेने मला गुरुस्थानी असलेल्या श्री. **पाठाऱ्याना** स्वतःच्या बाबतीत मात्र कष्टदशा आली! काही कंपन्यानी त्यांच्या नाटकांचे थोडेबहुत पैसे देऊन-देखील शेवटपर्यंत ती नाटके काही रंगभूमीवर आणली नाहीत. शिवाय, त्यांच्या चाहत्या व्यवसायबंधूनी तरी, स्वतःचेच तट्टू पुढे दामटून त्याना कमालीची कोपरखळी मारली. श्री. **कोल्हटकर-खाडिलकरा**प्रमाणे त्यांचा लौकिक चालू घडीपर्यंत कायम न टिकण्याला त्यांचे व्यवसायबंधूच कारण झाले! ज्याने त्याने नाटककंपनीतील तूप आपल्या पोळीवर ओढून घेतले. सारांश, अशा अनेक कारणामुळे श्री. **पाठारे** यांच्यासारखा उत्तम कवि व सुप्रसिद्ध नाटककार मागे पडून राहिला.

**गडकरी**:–अहो नाथ, तुम्ही तरी त्यांच्या बाबतीत असे कोणते हित केलेत?

**नाथ**:–( स्वगत ) ही स्वारी तर फार छद्मी बोलते आहे. ( उघड ) हो खरेच. माझी ती एक मोठी चूक झाली. त्यांच्या केव्हाहि तोलदार व हृदयंगम अशा अनेक नाट्यकृतीकडे केवळ जाणून बुजून नुसता अंगुलिनिर्देशहि न करिता मी स्वतःचीच चोपडी पुढे आणण्याचा मतलब साधला!

**गडकरी**:–ही जाणीव आधीच व्हायला हवी होती. 'बुंदसे गई सो हौदसे नही आती.' डझनावेरी नाटकांचे लेंढार प्रसवून प्रसिद्धि मिळविण्यापेक्षा त्यानी आपल्या एका **'संभाजी'** नाटकानेच कीर्ति मिळविली. श्री. **कोल्हटकर 'मूकनायका'** ने प्रसिद्धीला आले. आपले **देवल 'शारदा'** नाटकाने पोरापासून थोरापर्यंत

महशूर झाले. **अण्णासाहेब 'सौभद्रा'** ने लोकविश्रुत झाले. तसेच श्री. **पाठारे** हे एका '**संभाजी**'ने प्रसिद्धीला आले. १८९० ते १९१२ पर्यंत 'सं. संभाजी' नाटकाने सारा महाराष्ट्र आरपार हालवून सोडला. नाटककार म्हणून मी लोकादरास जरी इतका पात्र झालो होतो, तरी '**संभाजी**' नाटकापुढे माझे '**राजसंन्यास**' फिकेच पडले.

**देवल**:–बोलून चालून संन्यासच तो !

**अण्णा कि०:**–मास्तर, आज खऱ्याची परीक्षा कुणाला राहिली नाही; आणि यामुळेच अनभ्यस्त पोरसवदा लेखकांची 'बालामृत'–तृषार्त नाटके रंगभूमीवर येत चालल्यामुळे मराठी रंगभूमी रोगाळू लागली आहे. प्रेक्षकवर्गाहि निराळ्या दृष्टीचा बनत चालला आहे. याचे कारण उच्च दर्जाच्या नाटकातील रसास्वाद ग्रहण करण्याचा त्यांच्या बुद्धीत त्राण उरलेला नाही. नाटकातील काही शिकवणुकीने आपले चारित्र्य सुधारण्याला त्यांची बुद्धिमत्ता लंजूर झाली आहे, दुसरे काय ?

**प्रो. परांजपे**:–श्री. **यशवंतराव** उर्फ **आप्पा टिपणीसाबद्दल** म्हणाल, तर तेहि आज बरेच दिवस 'ॲनेमिया' ने आजारी आहेत. मराठी रंगभूमीवर आतापर्यंत त्यानी आपला लौकिक शिवाजी–एवढा वाढविला. स्वतःच्या संसाराची कदर न करता, इतरांच्या ग्रहदशेचा व जीविताचा अनावर बोजा स्वतःच्या शिरावर घेऊन आपले अनहित करून घेतले. सर्व काही केले; पण हलीची त्यांची परिस्थिति–शिव शिव !–हरीचा एकहि लाल आजकाल त्यांची हालहवाल कुणालाच पुसेनासा झाला आहे !!

**नाथ**:–आमच्या आप्पांची ही स्थिति जरी सर्वश्रुत असली, तरी शिवाजीमहाराजांच्या कथानकावरील एखादे नाटक कोणत्या तरी

कंपनीला देण्याचे ठरलेच असेल त्यांचे.पण आमच्या त्या श्री.**पाठाऱ्या**-पाशी आज दोन तीन उत्तम नाटके तयार असून देखील कंपन्यानी त्यांच्याशी जवळ जवळ नॉन्-को-ऑपेरेशनच केले आहे. ही मण्डळी अशा शोचनीय स्थितीत खितपत पडण्यापेक्षा मला वाटते, आपल्या इकडे लवकर येतील तर शारीरिक व मानसिक यातनातून तरी मुक्त होतील!

**अण्णा कि०**:-तर मग श्री. **पाठारे** हे आपल्या इथे एव्हाशीच काही येत नाहीत असे वाटते -

**नाथ**:-नाही-नाही-अगदी नाही! आताच मी सांगितले ना की सध्या त्यांची रचून तयार झालेली-**"भयंकर रक्तपात"** (प्रोज) आणि **"वत्सराज्यारोहण"** ( संगीत ) ही दोन व दुसरी नाटके छापून प्रसिद्ध झालेली प्रत्यक्ष पाहिल्याविना त्याना इकडे यायला सवडच नाही मुळी, असे ते कोणाहि पृच्छकाला ठासून सांगत असतात. अहो, आश्चर्य करण्यासारखी गोष्ट अशी, की आपल्या लिखाणापुढे स्वतःस जडलेल्या असह्य यातनांचीहि त्याना लेशमात्र परवा वाटत नाहीशी झाली आहे! अशा तऱ्हेची त्या गब्रूची महत्त्वाकांक्षा व आत्मविश्वास ही दांडगी आहेत! काय समजलात? आणखीहि ते म्हणत असतात, की माझी नाटके रंगभूमीवर माझ्या या हयातीत मी पाहिली नाही, तर पुनर्जन्म घेईन. आणि तेहि साधले नाही, तर मरणोत्तर पिशाच्च होऊन माझा तुंकार करणाऱ्या ठळक नटांच्या बोकांडी बसेन, आणि प्रेक्षकवर्ग त्यांच्या ज्या नुसत्या गाण्यावरच खूष होऊन आंधळा झाला आहे, त्या गाण्याचा गळाच दाबून टाकीन मुळात!

**देवल**:-अरे बापरे! अगदी योग्य आहे हे त्यांच्या बाबतीत.

**अध्यक्ष**:-बरे, अजून दुसरी काही मण्डळी तिकडे महाराष्ट्रात असावीत, अशी माझी समजूत आहे-

**नाथः**–आहेत तर ! श्री. **वरेरकर**, श्री. **अस्नोडकर**, **अच्युतराव कोल्हटकर**, श्री.—

**गडकरीः**–नाथ, थांबा जरा. निरनिराळ्या व्यवसायात गुंतून लहरीने केव्हा तरी एखादा प्लॉट तयार करणाऱ्या नामधारी नाटककारांची नुसती यादी नको आहे. ज्या कथानकाला देहान्त शासन देता येईल, असे साता नवसानी प्राप्त झालेल्या विद्वत्तेतून प्रसवलेले एकच नाटक सतरा नावानी अठरा कंपन्याकडे अगदी 'नवा खेळ' ह्मणून प्रयोगासाठी देणाऱ्या त्या विकारबहाद्दर नाटककारांची व एका रात्रीत पंचांकी नाटक खरडणाऱ्या शीघ्र गद्य कवींचा नामनिर्देशहि नको आहे आपल्याला. केवळ पोटाच्या पापाचा व्याप टाळण्यासाठी डळमळीत संपादकीय आसनावर सध्या विराजमान झाले आहेत ते बिचारे. आपल्या पत्रातील रंगभूमीच्या रागरंगाच्या भट्टीत व खास लेखांकांच्या परवडीत कोणत्याहि नाटककाराला व नाटककंपनीला जाळून पोळून त्यावर आपली अनुकूल प्रतिकूल मते देत असतात; परंतु स्वतःच्या नाटकाचे भडतूस नाटकमंडळ्याकडून होणारे शुभमंगल स्मशान-प्रसंगाइतकेच अमंगल असते. त्यांच्या संबंधात तूर्त पडण्याचे आपणाला मुळीच प्रयोजन नाही. हल्ली **'सार्वजनिक गणेशोत्सव'** जसे प्रत्येक गल्लीत चाळींच्या खुराड्यातून थाटण्यात येतात, तद्वत् गल्लीगणेश नाटककारांचे बरेच स्तोम माजले आहे आजकाल.

**प्रो. परांजपे**:–श्री. **वरेरकर मामा**संबंधी ह्मणाल, तर त्यांची आपल्या कार्याकरिता आज आपण अपेक्षा करणे केव्हाहि चांगले नाही. कारण, त्यांचा भाव वधारला आहे अलीकडे. आजच्या महाराष्ट्रीय नाटककारात ते एक **' बर्नार्ड शॉ '** होऊ पहात असून वाङ्मयात्मक वगैरे सर्वच बाबतीत ' नोबेल प्राईझ ' मिळविण्याची त्याना हाव सुटली आहे आजकाल. तेव्हा, अनिश्चित ध्येयाच्या

व दुटप्पी वर्तनाच्या असल्या निर्भेळ श्रीयुताला आपल्या उगवत्या कार्यात सामील केले, तर अखेर आपल्या नियोजित कार्याला संन्याशाच्या संसाराची दीक्षा देण्याचाच कटुतर प्रसंग येईल.

**देवलः**—(श्वास सोडून) विष्णवे नमः ! रास्त आहे तुमचे हे म्हणणे.

**नाथः**—प्रत्यक्ष मी अनुभवलेली आणखी एक गम्मत सांगतो. **अच्युतरावां**च्या सूत्रधरित्वामुळे थाटलेले २३ वे नाटय-सम्मेलन आटोपले. काही वर्तमानपत्रातून मामुली वृत्तांत आले. पण डॉ. **मा. मै. सुरतकर** यांच्या '**सावधान**' पत्रात सन्देशकारानी Cynic writing म्हणून फेटाळून लावलेल्या 'नाटय-सम्मेलनाचे नाटक' ह्या सणसणीत लेखाने सम्मेलनाचे व त्याच्या हंगामी चालकांचे नुसते बारा वाजविले ! सम्मेलनाच्या अध्यक्षीण सौ. **गिरिजाबाई केळकर** ह्या असल्यामुळे श्री. **वरेरकरमामां**च्या 'दुनिये'त ज्वालामुखी उठले. त्याना 'यागो'चा मतलब सम्मेलनप्रसंगी साधता आला नाही. पुढे '**सन्देश**' व '**दुनिया**' या पत्रांची मोरे धुमश्चक्री माजली. दोन्ही हमरीतुमरीवर आली. आता या दोघा श्रीयुतांच्या, गिरगावात खटाव मकनजीच्या वाडीतील पटांगणात 'गिरगाम जर्नालिस्टां'च्या एकजिनसी अध्यक्षतेखाली, अभूतपूर्व कुस्तीचा सामना होतो की काय, असे मला त्यावेळी वाटले. पण बरे झाले आपले. थोडक्यातच आटपले हे नाटक.

**देवलः**—नाथ, मघा आपण उल्लेखिलेल्या लेखातील आशय आहे का आपल्याँ लक्षात ? कळता तर बरे होते.

**कदमः**—('**सहकारी मनोरंजन मण्डळ**' करीत असलेल्या 'ललाटलेख' नाटकाचे उत्साही तरुण लेखक—उठून,) मास्तरसाहेब, त्या लेखातील बराच मजकूर मला शब्दशः सांगता येईल; परंतु आपल्याला असलेल्या अल्प कालावधीमुळे आताच तो मला

सांगता येत नाही. शिवाय, त्याच लेखकाने सुमोर सहा महिनेपावेतो ‘रंगभूमीचे पिठले’ या मथळ्याखाली ‘सन्देश’ पत्रातून एक लेखमाला सुरू केली होती ती व इतर नाट्यविषयक लेख एकत्र करून ‘**रंगभूमीवरील व्यासपीठ**!’ या नावाचे हस्तलिखित तयार असल्याचे मी पाहिले आहे. तरुण पिढीच्या हिताच्या दृष्टीने नाटयकलांतर्गत सर्व विषयांची त्याने निर्भीड चिकित्सा केली आहे व अनिष्ट दिशेने वहात जाणाऱ्या नाटयवाङ्मयाच्या ओघाचे ठळक चित्र रेखाटले आहे. असे उपयुक्त पुस्तक एखाद्या प्रकाशकाने घेऊन लवकरच ते प्रसिद्ध केल्यास ठीक होईल.

**नाथः**–एकजात **हरामखोर** आहेत आमच्या महाराष्ट्रातील सारे **प्रकाशक**. ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध लेखकांची जे डाळ शिजू देत नाहीत, ते एखाद्या नवीन होतकरू लेखकाला केव्हाच वाटाण्याच्या अक्षता लावतील समजलात. ज्याला आपल्या लिखाणाची खात्री असेल, त्याने दारोदार भीक मागून आपले लिखाण स्वतःच प्रसिद्ध करावे. निदान अभिनव लेखकाने तरी दगलबाज प्रकाशकांच्या पाशात केव्हाहि पडू नये, असे माझेच नव्हे तर सर्व अनुभवी मण्डळींचे स्पष्ट मत आहे. असो. माझे मित्र ते श्री. **विश्वनाथपंत** ऊर्फ **आबा शेट्येच** बघा ना. नाटके लिहिण्याच्या धंद्याला अगदी कंटाळले. कंपन्याकडून चांगल्या ठेचा खाल्ल्या. पण अखेर आता रत्नागिरीस वकिली करावयास गेले. मी म्हणतो त्यानी फार उत्तम मार्ग स्वीकारला.

**अण्णा कि०**:–असो. तर मग धरसोडीचे वर्तन करणाऱ्या अशा मण्डळीला आपल्या कंपूत न घेतलेले फार बरे; असेच ना ?

**देवलः**–अलबत !–आणि कदाचित् ही ध्येयभ्रष्ट व लोक-अमान्य मण्डळी इकडे आलीच, तर त्याना मी ‘hoot out’ करून घालवून देईन आपल्या या कंपूबाहेर. नकोच त्या पीडा या ठिकाणी.

**अण्णा कि०**:—राहूद्यात असल्या मण्डळीला तिकडेच चिरंजीव होऊन. अशा मण्डळीचा आपणाला संसर्ग देखील नको. ( बाजूला पाहून ) हे कोण गृहस्थ येताहेत बरे इकडे ? ( सर्वजण प्रवेशद्वाराकडे पाहू लागतात. )

**हरिभाऊ**:—हे तर आपले **प्रोफेसर भानू** होत.

**गडकरी**:—( स्वगत ) करा त्यांच्या जाहीर स्वागताची तयारी. आणि ते या स्वर्गलोकी आल्याबद्दल आनंदाचा—दुखवट्याचा नव्हे—एखादा ठरावहि करा पास.

**आगरकर**:—Halloo ! My dear Professor Saheb ! You joined us here at the proper hour !— आपण अगदी ऐन वेळी आलात इकडे !

**प्रो. भानू**:—अध्यक्षमहाराज व बंधूनो, मी आपला व्यवसायबंधु नसताहि आपण माझे इतके आदरातिथ्य केलेत, त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणि आहे.

**अण्णा कि०**:—नाही—नाही चिंतामणराव. आपण प्रत्यक्ष नाटकेच लिहून आमचे समव्यवसायी व्हावयाला नको आहे. अध्यात्मिक वगैरे विषयातील आपल्या विद्वत्तेचा दर्जा उच्च असला, तरी '**भरतमुनीचे नाट्यशास्त्र**' मराठीत उतरून नाट्यकलेविषयी आपण आपले प्रेम केव्हाच व्यक्त केले आहे. तेव्हा आपण मनात किंतु बाळगिण्याचे मुळीच प्रयोजन नाही. आपण सारी एकाच महाराष्ट्राची लाडकी लेकरे आहोत. सामुदायिक कार्यातील मतभेदाकरिता व्यक्तिद्वेष केव्हाहि असू नये. माझी आपली ही समजूत.

**प्रो. भानू**:—मुम्बईच्या 'ग्रन्थसंपादक व ग्रन्थप्रकाशक मण्डळी'च्या ज्युबिली महोत्सवाला उपस्थित राहून दोन शब्द बोलण्याची व श्रीमंत महाराज **सयाजीराव गायकवाड** यांच्या हस्ते

ता. १०-१-१९३० रोजी मला मिळणाऱ्या श्री. **यंदे शेटजीं**च्या शालीची पर्वा न करता, आपल्या या बैठकीचा वृत्तांत कळताच मी मायेची शाल पांघरून या स्वर्लोकचा पल्ला मोठ्या तांतडीने गाठला. हेतू हा की आपणा सर्वांची योग्य वेळी भेट व्हावी; व बैठकीतील निर्णयात्मक अहवाल प्रत्यक्ष कळावा.

**अण्णा कि०**:–बरे, आता आपण आपल्या नियोजित कार्याकडे वळावे, असे मी आपणा सर्वांना प्रेमाने सुचवितो.

**अध्यक्ष भावे**:–आपण सर्व मण्डळींनी एखादे नवीन नाटक रचून त्याचा या **कैलासवासियांच्या खास आश्रयाखाली** प्रयोग करण्याचे मघा वाटाघाट झालेले कार्य सर्वस्वी आपल्या हातचे आहे. त्याचा विचार आपणाला निवांतपणी व सवडीनुसार करता येईल. परंतु मराठी रंगभूमीवर नाटकमण्डळ्यांचा व नाटककारांचा आजच्या घडीला जो धुडगूस चालला आहे, त्याला योग्य पायबंद घालण्याकरिता आपण सर्वांनी मिळून एक विचाराने काही ठराव आजच्या या बैठकीत पास करून घेऊन ते महाराष्ट्रात नाट्य-सम्मेलनाच्या चालकाकडे व मथुरेचा शिक्का दाबल्याप्रमाणे काही ऐदी खुशालचेंडू गावगुंडाकडून पदवीदानाच्या खिरापतीची खैरात केलेल्या बऱ्याचशा नाटक कंपन्यातील लोकमान्य ठरलेल्या त्या बेमुरवत **नटसम्राटा** ( ? ) कडेहि रवाना व्हावेत, अशी माझी फार फार इच्छा आहे; पण ती आपणा सर्वांच्या मर्जीवर अवलंबून राहील.

**देवल**:–वा ! आम्ही सर्वजण आपल्या या योजनेला पूर्ण पाठिंबा देऊ.

**नाथ**:–नुसत्या धंदेवाल्या नाटकमंडळ्याच नव्हेत, तर सरोस ॲमॅच्युअर्सचाहि त्यात समावेश होणे अत्यावश्यक आहे. कसे अण्णासाहेब ?

**अण्णा कि०**:—या सूचना आम्हाला अगदी अगदी त्रिवार पसंत आहेत.

( दालनाबाहेरील रखवालदार आत येऊन अध्यक्षापाशी एक लखोटा देऊन निघून जातो. )

**भावे**:—( लखोटयातील पत्राकडे काही वेळ पाहून ) हे काय बुवा मानपत्र आले आहे आपणाला! मला तर काहीच कळत नाही याचा अर्थ. अहो शिवरामपंत, बघा हो काय आहे ते. आणि दाखवा एकदाचे मोठ्याने वाचून. (प्रो. परांजप्यापाशी पत्र देतात )

**प्रो. परांजपे**:—( पत्र वाचू लागतात )—

**"The Hindu Religionists' Association."**

**New World**, *D/ Nil.*

**भावे**:—शिवरामपंत, थांबा जरा. आंग्रेजीत लिहिलेले हे पत्र जसेच्या तसे वाचल्याने आम्हा सर्वांनाच कळेल असे नाही. करिता मराठीतच त्या पत्राचा भावार्थ आपण सांगितलात म्हणजे पुरे.

**प्रो. परांजपे**:—ठीक आहे. आपण सांगता तसे करतो. (पत्राचा भावार्थ सांगू लागतात. )—

" **नाटककारांच्या बैठकीचे अध्यक्ष** यास,

स. न. वि. वि. आपणास कळविण्यास आम्हाला आनंद होत आहे, की या लोकी **श्री भगवान् बुद्ध** व **श्रीमत् शंकराचार्य** आणि इतर यांच्या नेतृत्वाखाली वरील नावाचा समाज नुकताच स्थापन करण्यात आला असून, आपल्या महाराष्ट्रातर्फे विष्णुशास्त्री चिपळूणकर, रानडे, तेलंग भांडारकर, टिळक, गोखले, वगैरे मण्डळींनी वरील समाजाच्या कार्याचा सर्वत्र प्रचार करण्याचे खात्रीपूर्वक आश्वासन दिले आहे. **आर्यधर्मातून**

निरनिराळ्या मतांची आणि पन्थांची जी चिलीपिली बाहेर पडून आज स्वतंत्र झाली आहेत, व ज्या लचके-तोडीमुळे आपल्या आर्यधर्माला प्रेतकळा आली आहे, त्या सर्व कारणांचे एकमताने निराकरण करून, जगातील प्रत्येक व्यक्तीला मान्य होतील अशा तत्त्वाकरिता **आर्यधर्माचे शुद्धिकरण** करावयाचा आमचा उद्देश आहे कारण इतकेच, की आधिभौतिक प्रगतीच्या रामरगाड्यखाली पिचून निघालेल्या साऱ्या राष्ट्रांचे लक्ष, अध्यात्मिक उन्नतीचे माहेरघर जी आर्यभूमि तिच्याकडे आज लागले आहे. तेव्हा आपण आधीच एक जुटीने तयारीत असलेले बरे. आपल्या आजच्या महत्त्वाच्या बैठकीत पास होणाऱ्या ठरावात एकदेशीपणा येऊ नये, अनेकांच्या अधिक हिताला ते ठराव बाधक होऊ नयेत; कोणत्याहि कार्यात वा विषयात कूपमंडूकवृत्ति ठेवण्याचा काळ आज राहिला नाही; कोणतेहि कार्य, कोणतीहि चळवळ जगाशी टक्कर देण्याच्या हेतूनेच आरंभिली पाहिजे, म्हणून ह्या पत्रद्वारे आपणास ऐन वेळी कळवीत आहो, तरी कालचक्राच्या गतीबरोबर चालण्याच्या विचारापासून आपण सर्वांनी परावृत्त होऊ नये. आमच्या वरील कार्याची समग्र माहिती या लोकात सर्वत्र वेळोवेळी दिली जाईलच. कळावे. ही विनंती.

आपले नम्र सेवक,

(सही) **स्वामी विवेकानंद,**

(सही) **स्वामी रामतीर्थ.**"

( प्रो. परांजपे अध्यक्षपाशी पत्र देतात. )

**भावे**:—आमच्या आर्यधर्माचे श्रेष्ठत्व त्रिभुवनात प्रस्थापित करणाऱ्या ह्या विभूती देखील आपणाकडे सदयतेने पाहू लागल्या ! वा, आनंद आहे ! सद्गृहस्थहो, या पत्रातील आशय लक्षात ठेवून, त्याप्रमाणे आपले–या बैठकीचे–ठराव पास करून घ्याल तर बरे होईल. आपल्या या बैठकीचा आरंभ तर गोड झालासा दिसतो.

**गडकरी**:—( स्वगत ) उपरोक्त स्वामीद्वयानीच इषारा दिला म्हणून ठीक झाले. अशा तऱ्हेची नव मन्वन्तरातील नव-विचारांची भाषा आमच्यासारख्याच्या मुखावाटे जर का बाहेर पडती, तर आमची गणना खचित 'वेड्यांच्या बाजारा'त होती ! ( अध्यक्ष ठराव मांडण्यास सुरवात करतात. )

**अध्यक्ष भावे**:–ठराव पहिला:—

"मराठी रंगभूमीवर वाटेल त्या पोटभरू व कर्ज-बाजारी नाटकमण्डळ्यानी प्रवेश केल्यामुळे आमच्या नाट्यकलेला खग्रास ग्रहण लागण्याची वेळ येऊन ठेपली आहे–नव्हे लागलेच आहे. नाट्यकलेकडे लक्ष न देता केवळ उदरंभरण करण्याच्याच इराद्याने सुसं-घटीत व तोलदार नाटककंपन्यातील बेइमानी मण्डळी फुटून नवीन कंपन्या काढू लागली आहे. नाटक कंपनी स्थापन करण्यात कलेविषयी उच्च ध्येयाचा मुळीच पत्ता नसल्यामुळे नाट्यकला व नाट्यवाङ्मय याना एका तऱ्हेच्या व्यभिचाराची कीड लागत चालली आहे. या प्रका-राना आळा घालण्याकरिता महाराष्ट्रातील पुढारी मंडळींनी राष्ट्रहिताच्या दृष्टीने तज्ज्ञांचे एखादे शिष्ट-मण्डळ

स्थापन करून लुटारूपणा करणाऱ्या उपरोक्त नाटक-कंपन्यानी नाट्यकलेच्या क्षेत्रात व्यवस्थेशीर व इमानी-पणे राहण्याची प्रतिकाराची चळवळ करणे श्रेयस्कर आहे. आणि इतकेहि करून यशःप्राप्तीची जर काही आशा दिसली नाही, तर छापील व हस्तलिखीत नाटकावर काही तोलदार पत्रकारांचा योग्य अभिप्राय असल्याशिवाय नाटककंपन्याकडून लावल्या जाणाऱ्या कोणत्याहि नाट्यप्रयोगाच्या वेळी 'पिकेटींग' करावे, बहुजनसमाजाला वाईट प्रकारापासून परावृत्त करावे, असे या बैठकीचे मत आहे."

**प्रो. परांजपे**:–वरील ठरावाला पुष्टि देण्यापूर्वी मला दोन शब्द सांगावेसे वाटतात. मराठी रंगभूमीवर 'Criminal Tribes' प्रमाणे बऱ्याच पोटभरू व लुटारू कंपन्या शिरल्यामुळे, कोणत्याहि तऱ्हेचा नाट्यव्यवसाय करणे आजकाल धोक्याचे होऊन बसले आहे. शिवाय, कंपन्यातील बेवकूब, बेअक्कली व बदफैली नटवर्गाच्या वाह्यात वर्तनाचा राष्ट्राच्या भावी पिढीवरहि घातुक परिणाम होऊ लागला आहे. याचे प्रत्यंतर पहावयाचे झाल्यास, आमची नोकरी-पेशाची बरीचशी तरुण मण्डळी पहावी. क्लबातून मारे नाटकी चाळे करावयाला लागली असून नाटक्यांचे केवळ 'इमिटेशन' करू लागली आहे. सारांश इतकाच, की नाट्यकला ही राष्ट्राला पोषक आहे; त्या कलेच्या द्वारे कोणतेहि विचार समाजाला चट्कन पट-वून देता येतात; एखाद्या मतप्रसाराचे कार्य थोडेसे सुलभ होत असते; अशा तऱ्हेची दूर दृष्टि वरील नाटकमंडळ्याना मुळीच राहिली नाही. आचारी पाणक्यांच्या परंपरेतून अस्तित्वात आलेल्या संस्थास ती कशी असावी ? परंतु मुद्याची गोष्ट अशी, की कोणत्याहि संस्थामध्ये जर राष्ट्रीय दृष्टि नसेल, तर त्या संस्थापासून समाजाचे

काही हित न होता, उलट अवनतिकारकच काही परिणाम होतील हे निःसंशय आहे. तरी वरील ठरावास आपण सर्वांनी एक मताने सम्मती द्यावी असे मी सुचवितो.

**देवलः**—हा ठराव बहुमताने पास व्हावा असे मी मनापासून इच्छितो.

**सर्वजण**:—आमचे सर्वांचे एक मत आहे; करिता प्रस्तुत ठराव पसार व्हावा. (ठराव पसार! असे सर्वजण ठासून बोलतात.)

**अध्यक्षः**–<u>ठराव दुसराः</u>—

> " पहिल्या ठरावात नमूद केल्याप्रमाणे कोणत्याहि नव्या जुन्या नाटककारांच्या हस्तलिखित किंवा छापील नाटकावर तज्ञांचा व पत्रकारांचा समाजहिताच्या दृष्टीने लिहिलेला अभिप्राय असल्याशिवाय, त्या नाटकाचा प्रयोग करणाऱ्या कोणत्याहि नाटककंपनीवर सुशिक्षित समाजाने व नाट्यकलेतील अधिकारी मंडळींनी बहिष्कार घालावा, असे या सभेचे मत आहे."

**गडकरीः**—या ठरावाला मी दुजोरा देण्यापूर्वी एक अल्पशी सूचना मांडीत आहे. अलीकडे नाटकातून प्रसानुप्रासा ( alliteration ) ची भाषा योजून भाषाप्रभुत्वाचा मोठा आव आणून प्रतिभेची ऐट दाखवून मूळ कथानकाला देहान्त शासन देऊन नाटककारपणाचा सवंग टेंभा मिरविणाऱ्यांचा आणि माझ्या पश्चात् '**गडकरी–शिष्य**' असे म्हणवून घेणाऱ्यांचा-कालच्या पोरांचा–मनस्वी सुळसुळाट होऊ लागला आहे. समाजहिताची किंवा समाजशिक्षणाची चाड नसणाऱ्या कोणत्याहि पोरसवदा नाट्यलेखकाना वेळीच वठणीवर जर आणले नाही, तर वाङ्मयक्षेत्रात व समाजाच्या मानसिक क्षेत्रात अनावर अशी आपत्ति ओढवेल. करिता अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या होणाऱ्या चवचाल मण्डळींचा वर्तमानपत्रांच्या

जबाबदार व बहुश्रुत संपादक महाशयानी फाजील गौरव करण्याचा मोह वेळीच आवरला पाहिजे. आणि अशा तऱ्हेची काही कडक शिस्त अमलात आली, तरच मराठी रंगभूमीवर उत्तम दर्जाची नाटके दिसू लागतील; व त्यामुळे समाजाच्या मताला योग्य वळण लागण्याची काही चिन्हे दिसतील.

**देवल**:—गडकऱ्यांच्या या सूचनेसहित वरील ठराव पास करण्यात यावा.

**अध्यक्ष**:—मला वाटते की ज्या अर्थी आपणा सर्वांचे या बाबत एकमत आहे, त्याअर्थी दुरुस्त केलेला प्रस्तुत ठराव पास करण्यात येत आहे.

**ठराव तिसरा**:—

"आजकाल **Amateur Clubs**—"

**नाथ**:—अध्यक्षमहाराज, थांबा. हा तिसरा ठराव पुढे येण्यापूर्वी मी आपली एक सूचना-किंबहुना ठरावच-मांडीत आहे.

**अध्यक्ष**:—वा! अवश्य मांडा आपण.

**नाथ**:—"आजकाल शेफारलेली बरीचशी तरुण मंडळी क्लबांच्या आश्रमात राहून नाटकात सोंगे घेणे हेच आपल्या जीविताचे एक उच्च ध्येय आहे, अशा भ्रामक समजुतीमुळे नाट्यकलेच्या पद्धतशीर अभ्यासाकरिता आपल्या शिक्षणाचा काही एक उपयोग न करता, वेड्यावाकड्या नटण्यामुरडण्यातच आपणाला धन्य मानू लागली आहे. याचा परिणाम त्यांच्या कोवळ्या चारित्र्यावर भलत्याच मार्गाने होत असून, त्यांचे आयुष्य मातीमोल होऊ लागले आहे. अशा प्रकाराना आळा बसवून तरुण पिढीचे आयुष्य उज्वल

व राष्ट्रकार्यासाठी लायक बनेल, अशी उपाययोजना करण्यासाठी ज्या क्लबात नाट्यकलेचे काही ज्ञान असलेली मंडळी असेल, अशा Amateur क्लबानाच नाटककारानी आपल्या नाटकांच्या प्रयोगांची परवानगी द्यावी. असे केल्याशिवाय हल्लीच्या काही उल्लू तरुणाना जडलेले–आपल्या मळक्या मुखड्याला पेवडी फासून 'अगबाई' म्हणण्याचे–खूळ जावयाचे नाही."

**अण्णा किर्लोस्कर**:–नाथांचे हे म्हणणे रास्त आहे. का की, आम्ही पूर्वी नाट्यव्यवसायात आपले पाऊल टाकले, ते नाट्यकलेची काही सेवा करून तिची उन्नति व्हावी म्हणून. शिवाय, आमच्या पदरी जी काही मंडळी होती, ती पोटभरू नसून सुखवस्तु व गुणसंपन्न अशी होती. आताच्या नाटकमंडळ्यातून शेकडा नव्वद जणाना नाट्यकलेचे 'का' व 'कसे' ( Hows & Whys ), अभिनय म्हणजे काय, वगैरे गोष्टी जर कळत नाहीत, तर सारा दिवस नोकरीधंद्याच्या गुलामगिरीत घालवून क्लबात मिळालेल्या एक दोन कलाकांच्या अवधीत 'नट' बनून 'वन्स् मोअर'ना व टाळ्याना पात्र होऊ पाहणाऱ्या अर्धवट मंडळीला ते काय कळणार? व अभिनयाचे ज्ञान साध्य व्हावयाचे कसे?

**गडकरी**:–(आवेशयुक्त भाषणाने ) त्रिवार धिःकार असो या मंडळीला! आपल्या सान्निध्यात येऊ पाहणारा व आपल्या भोवती गोंडा घोळणारा एखादा 'नाटकी' रंगढंगाचा तरुण अमक्या तमक्या क्लबातून नाटकी सोंग घेणारा आहे, असे त्याच्या बहिरंगावरून व नटण्यामुरडण्यावरून थोडे नजरेस आले, की इभ्रतदार नाटककारानी व तदितर सज्जनानी त्याला आपल्या जोड्यापाशी देखील उभा करू नये. त्यांच्या झकपक परंतु हिडिस नखऱ्यामुळे तरुणतरुणींच्या भावना दुखवल्या जाऊन एकंदर नैतिकाचरणाला अनिष्ट

वळण लागत चालले आहे; समाजाची घडी विसकटली जात आहे, इतकेच नव्हे, तर या उडाणटप्पू नाटक्यांच्या बेताल वावरण्याने व त्यांच्या जीवनक्रमातील एकंदर धिंगाण्यानी **उजाड ध्येयाचे आणि उकिरड्या विद्वत्तेचे बाबूके भाई दरवेशी नाटककार** मात्र निर्माण होऊ लागले आहेत. क्लबरूमच्या फडताळात अशा **'कालिदास-भवभूति-भासां'** ची हस्तलिखित चोपडी डझना-वेरी सापडतील !

**देवलः**— छेः छेः, नुसते उभे न करण्यात विशेष नाही. त्या चवचाल नाटक्याचे फाटक्या वाहाणेनेच श्रीमुख रंगविले पाहिजे. त्याना बहिष्कृताप्रमाणे अगदी दूरच लोटले पाहिजे. अशा प्रसंगी मात्र आपण माणुसकीला थोडे विसरले पाहिजे. इलाज नाही.

**अध्यक्षः**—आजकाल अशा तऱ्हेची खेदजनक परिस्थिति निर्माण झाल्याचे आपण मंडळी स्वानुभावाने सांगता आहा, तर मघा नाथानी सुचविल्याप्रमाणे आताचा हा ठराव बहुमतानी पास करून घेणे आवश्यक आहे.

**सर्वजणः**—प्रस्तुतचा ठराव तिसरा आम्हाला अक्षरशः पसंत ! म्हणा ठराव पास ! ! ( टाळ्यांचा कडकडाट होतो. )

**अध्यक्ष भावेः—ठराव चवथाः—**

> " आमच्या मराठी वर्तमानपत्रकारानी ध्येयवादी नाटक-मण्डळया वगळून इतर ध्येयभ्रष्ट मण्डळांच्या नाट्यप्र-योगांच्या जाहिरातीना आपल्या पत्रात केव्हाहि स्थळ देऊ नये."

**अण्णा कि०:**—अहो अध्यक्षमहाराज, आमच्यावेळी वर्तमान-पत्रेच अगदी थोडी निघत. आताप्रमाणे त्यांचा सुकाळ व सुळसुळाट नव्हता; जी काही थोडी बहुत होती, त्यातून जाहिरातीचे पेव

हल्लीच्या इतके बेसुमार मात्र फुटलेले नव्हते; आणि जाहिरातीतील मोहक मजकुरावर भुलून जाऊन नाटकगृहाकडे धापा टाकीत पळत जाणारा प्रेक्षकवर्गहि त्यावेळी तितका अस्तित्वात नव्हता. नाटक-मण्डळ्या ठराविक, नाटके ठराविक, आणि नाटकातून कामे करणारी मण्डळी—तीहि पण ठराविक. सगळेच काही बालबोध वळणाचे.

**प्रो. परांजपे**:—अध्यक्षसाहेब, या ठरावाला माझा थोडा विरोध आहे. आपल्या या ठरावामुळे बिचाऱ्या त्या **मुमुक्षु** सम्पादक-श्रीयुतांच्या वर्तमानपत्री धंद्याला आपण प्रतिकार केल्यासारखे होईल. **जाहिरातींचे उत्पन्न म्हणजे आताच्या वर्तमानपत्रांचे अन्नपाणी.** ते बंद पाडून त्यांचे आपण नुकसान करता कामा नये. शिवाय, उद्या आपल्या या ठरावामुळे पत्रांच्या संपादकानी व चालक—मालकानी आपण म्हणतो तसल्या जाहिरातीना आपल्या पत्रात स्थळ दिले नाही, तरी तेवढ्याने आपले भागावयाचे नाही. कारण असे, की काही पत्रकार आपल्या पत्राचे रकानेच्या रकाने या नाटक्यांच्या वर्णनावारी खर्ची घालीत असतात. वाटेल त्या फाटक्या नटाचा 'उदो उदो' करून त्याला लोकादरास पात्र करण्याची वर्तमानपत्र म्हणजे मुलामा देणारी एक भट्टीच बनली आहे आजकाल. करिता, मगजफोड करून प्रस्तुत ठराव पास करण्यापेक्षा तो मुळातच रद्द करावा असे माझे स्पष्ट मत आहे.

**गडकरी**:—We condemn this resolution altogether. —बातल म्हणून समजतो आम्ही तो.

**अध्यक्ष**:—यापुढे आता मांडावयाचा ठराव म्हणजे

**ठराव पाचवा**:—

"महाराष्ट्रात नाटकमण्डळ्यांची फाटाफूट व्हायला मुख्य जी कारणे आहेत, त्यापैकी बेइमानी नटवर्गाची

सवत्या सुभ्याची अभिलाषा हे एक होय. एखादा नाट्यनिपुण व चांगला नट, स्वतःच्या जबाबदारीवर कर्जाचा बोजा घेऊन एखादी कंपनी उभारतो, पण पुढे थोड्याच दिवसात त्या कंपनीत फाटाफुटीचे सुरुंग उडावयाला लागले म्हणजे वरील इसमाला जगात आपले तोंड दाखवायची शरम वाटत असते. करिता ऐनवेळी दगा देऊन जाणाऱ्या नटवर्गाचा बंदोबस्त करण्याला एक इलाज आहे. तो असा, की कोणत्याहि एका कंपनीतून दुसऱ्या कंपनीत शिरणाऱ्या नटाने आपल्या पूर्वीच्या कंपनीकडून सर्टिफिकेट आणून दाखल करावे. ते जर उत्तम प्रकारचे म्हणजे त्याच्या इमान-दारीचे व भलाईचे व त्याच्या अंगी असलेल्या नाट्य-गुणांच्या उतम शिफारसीचे नसेल, तर जबाबदार व तोलदार–ज्याना नाट्यकलेची व समाजहिताची काही चाड आहे–अशा नाटकमंडळ्यानी वरील तऱ्हेच्या गावभटक्या ‘नटवर्याला’ केव्हाहि आश्रय देऊ नये. शिवाय, यच्चयावत् नाटकमण्डळ्यातून आज कायम असलेल्या सर्व नटवर्गाचे एक ‘रजिस्टर’ एखाद्या मध्यवर्ति शिष्टमंडळाकडे असणे अवश्य आहे. यामुळे एका कंपनीतून दुसऱ्या कंपनीत फंदफितुरीच्या अभि-लाषाला बळी पडून जाण्याचा त्यांचा मार्गच खुंटेल. नाटककंपन्यातून या रोगाचे निर्मूलन होऊन चालक-मालकाना आपला धंदा निर्धास्थपणे चालविता येईल.”

**सर्वजणः**–वा ! या ठरावाचे आम्ही जाहीर स्वागत व अध्य-क्षांचे अभिनंदन एकसमयावच्छेदेकरून अत्यानंदाने करीत आहो !

अध्यक्षः-ठराव सहावाः-

"अलिकडे भरविण्यात येणारी नाट्यसंमेलने म्हणजे अंकरहित असलेले असे नाट्यप्रयोगच झाले आहेत. संमेलनप्रसंगी पास झालेले सारे ठराव वर्षभर जागच्या जागीच विराम पावतात. संमेलनाचे उद्दिष्ट संमेलनप्रसंगी जमलेल्या बहुजनसमाजाच्या नजरेस न येता, काही करमणुकीच्या प्रकारांनी संमेलन साजरे करण्यात येऊन, प्रेक्षकांच्या डोळ्यात गाळीव धूळ मात्र फेकली जात असते. अशा तऱ्हेची सम्मलेने भरविणाऱ्या शिष्टांचा व सम्मेलनांची तळी उचलून धरणाऱ्या पत्रकारांचा ही बैठक प्रस्तुत ठरावाने जाहीर निषेध करीत आहे. असली संमेलने भरण्या-भरविण्यापेक्षा श्री. **फाळक्यांचे** दोन तीन दिवस चालणारे '**रंगभूमि**' नाटक सहस्र-पटीने बरे. तेव्हा, या सम्मेलनामुळे नाट्यकलेची काही प्रगति होईल, ती उच्च दर्जास पोहोचेल, अशी आशा करणे मृगजलवत् ठरेल. म्हणून यापुढे भरविण्यात येणाऱ्या **नाट्य-संमेलनांचा ही बैठक तीव्र निषेध करीत आहे**."

**गडकरीः**-प्रस्तुत सहाव्या ठरावाच्या पुष्ट्यर्थ मी काही विचार आपणापुढे मांडीत आहे. नाट्य-संमेलन असो, महाराष्ट्र-साहित्य-समेलन असो, सभा असो, गाणे असो, काहीहि असो; त्या ठिकाणी करमणुकीचा एखादा और प्रकार नसला, तर उपस्थित राहणाऱ्या प्रेक्षक-प्रतिनिधींचा दुष्काळच पडावयाचा! याचे कारण असे, की आमच्या अर्धवट व चवचाल शहरी शिष्टाना खऱ्याची कळकळ तिळमात्र राहिलेली नाही. असो. आजवर ही नाट्य-संमेलने सुमारे दोन डझन भरली; परंतु नाट्यकला व नाट्यसंस्था

यात समाजहितवर्धक अशी काहीच विधायक सुधारणा झालेली नाही. संमेलनप्रसंगी नाट्यविषयातील तज्ञ मंडळी उपस्थित राहण्याच्या बाबतीत निष्काळजी असते. त्याना त्याची पर्वाच नसते. सम्मेलनाचे मामुली नाटक साजरे करणाऱ्या धडपड्या व्यक्तींच्या जोडेफाडीने इकडून तिकडून बळेच बोलाविलेल्या दहा पाच ठळक व्यक्तीपुढे व लहरीने आलेल्या अल्पसंख्याक श्रोतृवृंदासमोर संमेलनाचा सारा कार्यक्रम—जवळ जवळ फार्सच—पार पडत असतो. मागील सार्‍या संमेलनात नाट्यविषयक ठरावांचा मुसळधार पाऊस पडला; विषय नियामक सभेत ठरावातील ऱ्हस्व दीर्घावर कडाक्याच्या वादविवादाची मारे कुतरओढ झाली; संमेलनाच्या सभागृहातील वातावरण दुमदुमून गेले; उपस्थित बोलघेवड्यानी आपल्या बत्तीशी थाटात एकमेकांचे हार्दिक अभिनंदनहि केले; पण अखेर—अखेर काय ! त्या **ठरावांचे गाठोडे** गंगाजळीतल्या ठेवीप्रमाणे आजवर जपून ठेवण्यात आले!—संमेलनात वक्तेबाजी करणारे सम्मेलन-कार्योत्तर बारा महिने स्वस्थ पडून राहिले!—आणि त्या अवधीत पूर्वी पास करण्यात आलेले सारे ठराव कोमेजून शेणखाईत पडले!—तरी त्याबद्दल कोणी कोणाला जबाबदार धरावे व कोणी कोणाचे अशौच पाळावे, इतकाच प्रश्न शिल्लक उरत असतो. समाजातील प्रतिष्ठित पुढारी, विद्वान् व बहुश्रुत मण्डळी, तोलदार व भारदस्त पत्रांचा सम्पादकवर्ग, अनुभवी व नाणावलेले नाटककार, निष्णात व लोकादरास पात्र झालेला इभ्रतदार नटवर्ग, आणि प्रत्येक नाटक-मण्डळीचा मालक व चालक, अशा तऱ्हेची बहुरंगी मंडळी संमेलनाना उपस्थित राहून, त्यांच्याकडून समतोल विचाराने काही प्रशंसनीय कामगिरी होत गेली, तर संमेलनांचा दर्जा इतर सभा-परिषदांपेक्षा द्विगुणित होईल. बहुजनसमाजाकडून कधीच मग हेटाळणी व्हावयाची नाही. समाजाचे उलट हितच होईल.

**अण्णा कि०**:—वास्तविक, नाटककारांनी आपापल्या परीने रंग-भूमीवरील थोरेपालटांचे सूक्ष्म निरीक्षण करून संमेलनप्रसंगी अध्यक्षांच्या व इतर सभासदांच्या दृष्टोत्पत्तीस रंगभूमीवरील व नाट्यकलेतील वैगुण्यासंबंधी काही मुद्दे आणून त्यावर यथामति दोन शब्द सांगून भावी ठरावांची भूमिका आधीच तयार करून ठेवावयाची. नाट्यकलेसंबंधी चार ओळी वर्तमानपत्रातून लिहावयाच्या. पण त्यांच्याकडून हे व्हावे कसे? कारण, स्वतःचे नाटक कंपनीकडून रंगभूमीवर येण्याच्या इच्छेपेक्षा रंगभूमीच्या प्रगतीचा ध्यास त्याना मुळीच लागलेला नसतो. धर्मशाळेत औटघटका आश्रय करणाऱ्या संन्याशाइतकीच कदर त्याना या संमेलनाविषयी असते. स्वार्थाच्या भूकेपेक्षा कलेच्या जोपासनेची त्याना पर्वाच नसते.

**देवल**:—नाटक्याना समाजाकडून आज जितका मान (?) मिळतो आहे—किंबहुना त्यांची हेटाळणीच होत असते—तितकाच आणि तसलाच मान नाट्यविषयातील तज्ञाकडून संमेलनांच्या झोळीत पडू लागला आहे! करिता, नाटक-तमाशाप्रमाणे साजरी होणाऱ्या संमेलनावर यापुढे वरील ठरावाने आपण बहिष्कार घालणेच योग्य होईल.

**काहीजण**:—प्रस्तुत ठरावातील एकंदर मुद्यांच्या मानाने व आतापर्यंत त्यासंबंधी झालेल्या अनुभवपूर्ण चिकित्सेमुळे, तो खरो-खरीच अत्यंत महत्त्वाचा आहे; करिता आम्हाला तो अक्षरशः कबूल आहे—पसंत आहे—मान्य आहे! म्हणा, ठराव पसार!

**अध्यक्षः—ठराव सातवा व शेवटचाः—**

“ आतापर्यंत आपण वर्णन केलेली नाटककार व नाटकमण्डळ्यांची जी स्थिति, तीच चित्रपटलेखकांची व चित्रपटसंस्थांची झाली आहे. फाटाफुटीचे वातावरण

बरेच जोराने वाहू लागले आहे. नीतिभ्रष्ट पतित स्त्रियांचे बण्ड अधिक माजल्यामुळे त्या संस्थांच्या चालकांच्या मनात परस्पराविषयी किल्मिष उत्पन्न होऊन त्याचा परिणाम संस्थेच्या दुफळीत दिसू लागला आहे. चित्रपटांची कथानके उद्बोधक न निघता, ती प्रायः विकारांचे उद्दीपन करणारी अशीच निघू लागली आहेत अत एव या संबंधीचा प्रश्न नाट्य-सम्मेलनानी किंवा समाजातील काही पुढाऱ्यानी सोडविण्याचा प्रयत्न करावा, असे या बैठकीचे स्पष्ट मत आहे. "

**नाथः**—चित्रपटामुळे नाटकमंडळ्यांच्या धांगडधिंग्याना बराच आळा बसत चालला असून, काही कालाने नाटकवाल्यांचे जीवित केविलवाणे होईल. लोकाना आजकाल जी दृश्ये हवीत त्या मध्ये realism पाहण्याची त्याना फार हाव सुटली आहे. बोलक्या चित्र-पटानी त्या धंद्यात अभूतपूर्व जिवन्तपणा आणला आहे. हे चित्र-पटच एक चकारीच्या आमच्या रूढीप्रिय नाटकमंडळ्यांच्या मुळावर बसतील. हिन्दी चित्रपट संस्थांचे गर्भसंभव जोपर्यंत गुजराती शाम-ळदास शेटजींच्या नुसत्या पैशानेच होत आहेत, तोपर्यंत त्यात जिवन्तपणाचे सर्वगामी चैतन्य थरारणे शक्य नाही. सिनेमा नटींचा खुबसुरतपणा पाहून, बँकावर चेक लिहून देणारे शेटजी नकोत. या धंद्यात आपले बुद्धिसर्वस्व ओतून त्यात जिवन्तपणाची मूस ओतणारी बुद्धिवान् व कदरबाज मंडळीच हवी. या कलेची सर्वांगीण चिकित्सा होण्यासाठी उच्च दर्जाची नियतकालिके जन्मास येणे आवश्यक आहे. फिल्मकंपन्यांचा, चित्रपटांचा, डिरेक्टरांचा, नट-नटींचा, मोठाल्या जाहिराती मिळविण्याच्या पोटाळ अभिलाषाने आपल्या पत्रात नसता उदो उदो करणारी व स्तुतिपाठ गाणारी वृत्तपत्रे नकोत. अशा तऱ्हेची वृत्ति वरील धंद्याला घातुक ठरेल.

**सर्वजण**:—प्रस्तुत ठराव आपल्या विषयमर्यादेबाहेरचा असला, तरी नाट्यविषयाशी तो थोडा संलग्न असल्यामुळे आम्ही आनंदाने हा ठराव पसार करतो.म्हणा तर,सातव्या ठरावाचा जयजयकार असो !

( इतक्यात एक दूत आत प्रवेश करून, बाहेर कोणी गृहस्थ आल्याचे कळवितो. )*

**अध्यक्ष**:—जा, एका घटकेने त्याना आत पाठीव. (दूत जातो.) या बैठकीला उपस्थित राहणारी सारी मंडळी तर येऊन चुकली; आणि अखेर हे नवीनच प्रकरण काय उद्भवले नकळे !

**नाथ**:–( लगबगीने उठून, मोठ्याने ) अध्यक्ष–महाराज व सद्‌गृहस्थ, आपल्या या बैठकीत काही और रंग–थोडा तिखटपणा आणणारी व्यक्ती येऊन थडकली आहे बाहेर. आपले '**संदेश**'कार ! दे. भ. **अच्युतराव कोल्हटकर** !

**प्रो. परांजपे**:—अध्यक्ष महाराज व प्रिय बांधव, बाहेर आलेले गृहस्थ 'सन्देश'कारच असतील, तर इथे त्यांच्या आकस्मिक येण्याने आपणाला सखेदाश्चर्य वाटण्याचे वा भिण्याचे काही कारण नाही. माझ्या पश्चात् मराठी वृत्तपत्रव्यवसायात अच्युतराव हे एक मुकुटमणि होते ! पदवीधरापासून तो गिरणीकामगारापर्यंत वर्तमानपत्र लोकप्रिय करण्याचे त्यांचे बुद्धिकौशल्य असामान्य कोटीतील होते ! दोन चार ओळींचा मजकूर अठ्ठावीस तीस रकान्यात विस्तृतपणे व चटकदार भाषेत लिहिणारा महाराष्ट्रातील एक कल्पनातीत कल्पक, सव्यसाची व प्रतिभासंपन्न लेखक, वक्तृत्व आणि वर्तमानपत्र यांच्या साहाय्याने मजूरवर्गाला राष्ट्रीय स्वातंत्र्याचे ताजे ताजे बाळकडू पाजणारा एक निस्सीम

* येथपासून पुढे अच्युतराव कोल्हटकरांच्या भाषणापर्यंतचा सर्व मजकूर नवीन घातला आहे.

देशभक्त आपल्या इकडे आल्याने महाराष्ट्राचे काही विवक्षित क्षेत्रात जरी नुकसान झाले असले, तरी आज आपण सर्वांनी त्यांचा सत्कार करणे श्रेयस्करच ठरेल, अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

**देवल**:–वाः ! फार नामी गोष्ट घडली! तिकडे महाराष्ट्रात कष्टप्रद आयुष्य कंठण्यापेक्षा आमचे अच्युतराव आज इकडे आले हे एका दृष्टीने मी म्हणतो उत्तमच झाले. " **जो लोककल्याण । साधावया जाण । घेई करीं प्राण । त्या सौख्य कैचें ॥ धृ० ॥ बहु कष्ट जीवास । दुष्टान्त उपवास । कारागृहीं वास । हे भोग त्याचे ॥ १ ॥ निंदा जनीं त्रास । अपमान उपहास । अर्थी विपर्यास । हें व्हावयाचें ॥ २ ॥** "

**गडकरी**:–अरे रे ! फण्डगुण्डांची बिंगे चव्हाट्यावर मांडणारा, दे. भ. श्री. **नरसोपंत केळकर** व श्री. **वरेरकर मामा** यांचा करमणूकीखातर कधी आवस-पौर्णिमेला पिच्छा पुरविणारा व निर्भेळ स्वातंत्र्याकरिता तनमन अर्पण करणारा आमचा **नेपोलीयन**–एक खंदा वीर-**गिरगाव-वृत्तपत्रांच्या रणभूमीवरून** एकाकी पाठमोरा झाल्याबद्दल माझ्या मनाला तीव्र वेदना होताहेत. तिकडील ही उणीव कोण बरे भरून काढील यापुढे. माझा हा सवाल आहे आपणाला.

**नाथ**:–राहू द्या हो मास्तर. तुमचे आपले भलतेच काही तरी. मी म्हणतो, **अच्युतराव** हे नाटककार–एक शीघ्र नाटककार होते. एका रात्रीत साग्र संगीत नाटक तयार! चांदबिबीच्या नाटकातला पाचवा अंक एकीकडे नाटक चालू असता कि हो त्यानी लिहून काढला! **नारिंगी निशाण** संस्था काढून माझ्यासारख्या एका पांगळ्या मित्रालाहि रंगभूमीवर काम करावयाला लावले त्यानी ! नाट्य-सम्मेलने यशस्वी करण्याचे त्यानी परिश्रम घेतले. तरुण व

होतकरू मंडळीला पुढे येण्यास त्यानी केव्हाहि प्रोत्साहनच दिले. आपले विचार, आपली विद्वता व आपला अनुभव केव्हाहि पडद्या-आड ठेविला नाही त्यानी. अधिक स्पष्ट व खरे बोलावयाचे म्हणजे असे, की संधि आली, तर कोणाचा पाडाव करण्यासाठी त्यानी आपले बुद्धिकौशल्य केव्हाहि शिथील पडू दिले नाही. स्वतःच्या नावाचा जयजयकार होण्यासाठी आपल्या मालकीच्या पत्रातून मजकूरवजा जाहिराती देण्याची अभिलाषा त्यानी केव्हाच ठेविली नाही; परंतु इतरांची 'ब्र' म्हणता झालेली ब्रह्महत्त्या विकृत स्वरूपात चव्हाटयावर मांडण्याची दक्षता त्यानी आपल्या उरापोटाशी अहोरात्र बाळगिली. एखाद्याच्या डोक्यावर आज लाथ, तर उद्या आपलेच डोके त्याच्या चरणी! **लोकमान्य टिळकाना** आजन्म गुरु मानण्यात आमच्या या विराच्या विनयादि गुणात भरच पडे; पण १९१८-१९ सालच्या 'टिळक-पर्स-फण्ड' प्रकरणी आपल्या प्रिय व आदरणीय गुरूला **'लोकमान्य बाळंतीण झाले!'** अशा सन्देशी मथळ्यांची गुरुदक्षणा देण्यात-किंबहुना असला गुरु-शिष्य व्याभिचार करण्यात-त्यानी आपल्या जातभाईंची सहानुभूति गमाविली! पुणेकरांच्या प्रेमाला पारखे झाले! पस्तीसशे रुपयांच्या मागे लागून, 'सन्देश' पत्राचा तोल घालविला! त्यांच्यावर नवीन नवीन आपत्ती येण्याला एव्हापासूनच आरंभ झाला. संकटांच्या भुंग्यानी त्यांचे शरीर आतून बरेच पोखरले होते, तरी देखील त्या संकटांचे गाठोडे बाजूला ठेवून त्यानी तिकडील आपले सारे आयुष्य हसत मुखाने काढले! अशा तऱ्हेचे परस्परविरोधी गुण त्यांच्या ठिकाणी वसत होते.

**गडकरी**:—नाथ, मला वाटते त्यांच्या मिनिटागणिक त्या विक्षिप्त हसण्यात सोमल-बचनागाचे मिश्रण झाल्याचा भास होई!

त्यांचे सर्व काही विचित्रच होते. पतिव्रता-कुटिला, सच्चा-लुच्चा, सोने-लोखंड, वगैरे सर्व तऱ्हेचे त्यांच्या स्वभावात मिश्रण होते.

**प्रो. केळकर**:–इतके वहात जाऊ नका गडकरी. It is disgraceful on your part.

**प्रो. परांजपे**:–सद्गृहस्थ हो, अच्युतरावांचा दर्जा काही निराळा होता. त्यांची पूर्वीची देशसेवा वाखाणण्यासारखी होती. १९०८ सालच्या तुरुंगवासात त्यांच्याइतके करुणास्पद हाल महाराष्ट्रातील फारच थोड्यांच्या वाट्याला आले असतील ! आणि मराठी सम्पादकीय क्षेत्रातील त्यांचे स्थान आणखी काही काळ अढळच राहील, यात शंका नाही. महाराष्ट्रातील होतकरू तरुणांचा हा धैर्यशील सेनापति आज इकडे आल्याने त्यांची स्थिति मात्र पोरक्याप्रमाणे झाली असेल संकटग्रस्त शालशिष्ठांचा सल्लागार दृष्टि-आड झाल्यामुळे त्याना आज चुकल्यासारखे झाले असेल. या **महाराष्ट्राच्या जॉन्सनने** महाराष्ट्राला दुःखात मात्र ठेविले––

**कदम**:–**'सन्देश'** पत्रात ता. २२ जून १९२८ रोजी आपल्या या नाथांचा मृत्युलेख लिहितेवेळी आमच्या 'साहेबां'ना अनावर दुःख झाले होते ! तिकडे एकटे राहण्याचा त्याना मत्सर वाटू लागला म्हणून तर इकडे कूच करण्यात त्यानी इतकी 'घिसाड घाई' केली.

**गडकरी**:–घिसाडघाई नव्हे ही. ही अच्युतरावी पॉलिसी आहे. ही ' सन्देशी ' पगडीपालट आहे. अंगावर येणाऱ्या बाजूचा सहज प्रतिकार करण्यात आपल्या चतुरस्र बुद्धीचा उपयोग करणे झालाच आम्ही ' SANDESH PROPAGANDA ' असे म्हणतो. सन्देश-कुशलतेची व कल्पकतेची कळी उमलू लागली, म्हणजे ' सन्देशचा फुलबाग ' बहरून जाई; त्याचा परिमळ चौफेर दरवळे ! ( अच्युतराव कोल्हटकर प्रवेश करतात; इतर मंडळी गप्प राहतात. )

**अच्युतरावः**–( धोतराच्या निऱ्या दाबून, चष्मा सावरून व दोन्ही हात खिशात ठेवून, ) अध्यक्षमहाराज व प्रिय बंधूनो, आपल्या या बैठकीचे काम बहुतेक संपलेच आहे, तेव्हा आपला मी अधिक वेळ घेऊ इच्छित नाही. आपण सर्वांनी पास केलेल्या ठरावांचा मजकूर या पूर्वीच माझ्या लक्षात आला असल्याकारणाने त्या ठरावाना माझी पूर्ण सम्मती असल्याचे आपण नमूद करावे.

**गडकरीः**–पण काहो साहेब, इतकी घिसाड घाईशी केलीत इकडे येण्यात ?

**अच्युतरावः**–मास्तर, '**गंगापूरच्या टेलिग्रामची घिसाड घाई**' मात्र नव्हे ही. महाराष्ट्रातील माझे कार्य बहुतेक आटोपलेच होते. उगाच खडतर दशेत दिवस घालविण्यात मला समाधान वाटेना. आपल्या वेळच्या या जुन्या मंडळीत गेल्याने नव्या पालवीच्या आमच्या तरुण मंडळीचा नाचरेपणा दृष्टिआड होईल, बेलगामी वृत्तीच्या वीरानी नर्थातून मजवर रोखलेल्या वाक्बाणांचा नेम चुकेल, मी अधिक घायाळ होणार नाही, म्हणून इकडे येण्याची घाई केली.––

"**मात्सर्याचा भरला वारा, अहंपणाचा सर्व पसारा,**
**अज्ञानाची मिरवे द्वाही, रसिकत्वाला थारा नाहीं.**
**काय अशा जनतेंत रहावें? काय पहावें ? काय चहावें ?**"*

अशा तऱ्हेच्या झंझावातात गुरफटून मी गुदमरू लागलो, तेव्हा विचार केला, की आपल्या आवडत्या महाराष्ट्राला शेवटचा राम राम ठोकून दूर सरलेले बरे !

**देवलः**–अगदी योग्य केलेत.

---

*कवि विनायक जनार्दन करंदीकर ( सन १८७२–१९०९. )

**नाथः**—साहेब, स्वराज्य आणि शिवाजी या दोन विषयाना आपण सर्वस्वी वाहून घेतलेत. **त्रिशतसांवत्सरिक श्रीशिवजयन्त्युत्सवाची** लोकप्रियता आपण खालच्या वर्गात देखील वाढविलीत. त्याकरता कोकणपट्टीचा खडतर प्रवास करून इतके कष्ट सोसलेत, की **लो. टिळक** आपल्या पश्चात् आज महाराष्टात असते तर पुण्याच्या पेठेत आपले स्मारक झालेले लोकाना खचित दिसले असते ! ( टाळ्या. )

**अच्युतरावः**—नाथ, चुकलात तुम्ही. या गोष्टीला, असल्या कीर्तीला मी पात्र नव्हतो. महाराष्ट्राची मी जी अल्प सेवा केली, त्यामधील माझ्या सेवेचा उत्तर भाग कवडीमोल ठरविण्यात आला होता. व्यक्तिशः मी तुच्छ लेखला जाई. आपण म्हणता तशी विधिघटना ठरती, तर माझी खात्री आहे, की आमच्या दे. भ. **नरसोपंतां**च्या नेतृत्वाखाली लोकमान्यांच्यापक्षाने मोठे आकांडतांडव केले असते; जोराचा विरोध केला असता; आपापसात त्या **पुणेकरात पानिपतची पुनरावृत्ति** कदाचित् झाली असती ! मी म्हणतो, झाले हेच योग्य झाले.

**प्रो. परांजपेः**—अगदी अक्षरशः खरे म्हणालात.

**गडकरीः**—आणि मी देखील तेच म्हणणार होतो. पुणेकरांचाच नव्हे, तर साऱ्या एकजात महाराष्ट्राचा चांगलाच अनुभव आहे मला. आजचा विषय पडला जरा निराळा. नाहीतर **नवमतवादित्वाचे तेजोवलय** पाहण्यास दृष्टि नसलेल्या, सामाजिक प्रश्नात **'S. M. Railway'** प्रमाणे रेंगाळत चालणाऱ्या आणि अंधश्रद्धेच्या कुजकट डबक्यात रव रव किड्याप्रमाणे वळवळणाऱ्या महाराष्ट्रावर—अखिल हिन्दु समाजावर—बरेच आरोप करावयाचे माझ्या मनातून होते.

**आगरकर**:–Hear ! Hear ! ! पुरुषाने स्त्रीला गुलामगिरीच्या शृंखलेत जखडून ठेवून, सामाजिक व आर्थिक पारतंत्र्यात डांबून टाकून, तिच्या उच्च शिलाबद्दल, तिच्या उच्च संस्कृतीबद्दल, तिच्या पातिव्रत्याबद्दल जगभर दवंडी पिटणारे मोंगलवृत्तीचे आमचे पुरुष कोणत्या शिक्षेला पात्र होतील ? सामाजिक स्वातंत्र्याकरिता बण्डाचे निशाण आमच्या स्त्रीवर्गानेच आपल्या हाती घेतले पाहिजे; त्याशिवाय 'Women's right to equal inheritance and the right to divorce' ( स्त्रीचा समान वारसा हक्क व विवाहसंबंधमोचनाचा हक्क ) Progressive Legislationच्या द्वारे अमलात येणे शक्य दिसत नाही.

**प्रो. केळकर**:–Well done you both my new friends ! I admit your each and every sentence.

**नेवाळकरादि**:–( 'Shame, Shame' असे ओरडून ) आमचा कसून विरोध आहे ह्या निरर्गल प्रलापाना. सध्या अक्षरशः निवृत्तावस्थेत सर्व व्यापांचा संन्यास करून, कर्जत मुक्कामी रहात असलेल्या त्या **'प्रबोधन'**कार **ठाकऱ्यांचे** **'वज्रप्रहार'** नकोत तूर्त या ठिकाणी आमच्याच्याने ते सोसवत नाहीत.

**अण्णा कि०**:–( एकीकडे ) ही बैठक की बण्ड ! आहे तरी काय हे गौडबंगाल ! आमच्या या अध्यक्षांच्या दशावतारी खेळात रंगभूमीवर बेसुमार थैमान घालणाऱ्या त्या अक्राळविक्राळ राक्षस पात्रांची कोण्मला भीति वाटत नसे; परंतु इकडील या तीन चार तिखट–जहाल–व्यक्तींची मला फारच भीति वाटू लागली आहे मघापासून. आपल्या त्या **बाबुगेनू, भगतसिंग,** वगैरे हुतात्म्याना व **टिळक, लाला लजपतराय, श्रद्धानंद, पंडित मोतिलाल नेहरू,** वगैरे राष्ट्रधुरीणांना आधी भेटून, त्याजबरोबर देशाच्या भवितव्यतेविषयी काही विचारपूस करावयाचे टाळून, या बैठकीच्या

कामात थैमान घालावयाला आली कोठून ही ब्याद. सुरळीत चाललेल्या एखाद्या गोष्टीत विरजण घालणें, ह्या स्वारीचे ब्रीदच दिसते मला.

**देवलः**—वरील प्रकारच्या भाषणाना माझा विरोध नसला, तरी वेळेच्या अभावी आपल्या या बैठकीचे काम आवरते घेणे बरे होईल.

(आपले भाषण आटोपते घेण्याविषयी अध्यक्ष भावे हे अच्युतरावास सुचवितात. )

**अच्युतरावः**—आपल्या सन्माननीय अध्यक्षमहाराजांच्या सुचनेवरून मला आपल्या भाषणाचे क्षेत्र एक दोन मुद्दे सांगून मर्यादित करणे भाग पडत आहे. आम्हा महाराष्ट्रीयांचा स्वभाव, आमची पिण्डप्रकृति, ही मोठी चमत्कारीक आहेत. देशभक्तीच्या सवंग नावाखाली स्वतःचा पक्ष, स्वतःची जात, स्वतःचे मत व सांप्रदाय यांचे हवे तसे स्तोम माजवून, इतराना नामोहरम करण्याची प्रवृत्ति गेल्या पाव शतकापासून बळावत चालली आहे. कूपमंडूकवृत्तीमुळे आमचे काव्य-नाट्य-कथादि वाङ्मय होरपळलेल्या कल्पनांचे कुण्ड बनले आहे. तीव्र जातिभेद, कलहप्रियता आणि मत्सरग्रस्तता यांची महाराष्ट्राच्या सर्वांगावर व्याधि उठली आहे. सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवून, दारिद्र्यावस्थेत देशसेवेच्या अग्निकुंडात उडी घेणारे महाराष्ट्रीय विरळे. आमच्या चळवळीतील कलह विवादकौशल्यद्योतक असतात. आचार-उच्चारात नेहमीच विरोध. आळस हा आमचा प्यारा जानी दोस्त झाला आहे. महाराष्ट्रात तत्त्वनिष्ठ पुरुषांची ज्यावेळी अधिक निपज होईल, त्याच वेळी महाराष्ट्राच्या भाग्याचा सूर्य प्रकाशमान होईल; त्याच वेळी महाराष्ट्राचा '**भगवा झेंडा**' दक्षिणोत्तर फडकून, उपलाणी अश्वाप्रमाणे अखेर खैबरघाटापार जाईल, असे माझ्याप्रमाणे आजवर इतरजण म्हणत आले, ते काही

अगदीच खोटे नव्हे. बरे, तरुणाकडे पहावे, तो त्यांच्या विचार-शक्तीची आणि कल्पना बुद्धीची वाढ होण्याऐवजी विनाशक खतांच्या पोषणामुळे त्या खुंटत चालल्या आहेत. ही तरुण मंडळी जोमदार, सच्छील व आशावादी झाली पाहिजे. " आजकाल देशाला **तरुणांची गरज आहे.** आजकाल **देशाला तडफदार तरुणांची गरज आहे.** किंबहुना देशाकरितां आजकाल प्रत्यक वयोवृद्ध मनुष्य तरुण व्हायला पाहिजे आहे. **दर्जा, दर्जा**(Status) ही आजकाल हिंदुस्थानांतल्या लोकांची अवश्यकता आहे. तो दर्जा प्राप्त करून द्यायला एकीकडून ब्राह्मण, एकीकडून ब्राह्मणेतर, एकीकडून सनातनीय, एकीकडून सत्यशोधक, एकीकडून आर्य-समाजी, एकीकडून प्रार्थनासमाजी ह्या सर्वांनीं धांवलें पाहिजे. एव-ढेंच काय, ज्यांना **भट**शाही, **भट**शाही असें म्हणतात त्या श्रद्धा-वान् व निश्चयी पण कालव्यत्ययामुळें अत्यंत दुराग्रही व जुलमी भासणाऱ्या पुरोहितवर्गानें **अग्निमीळे पुरोहितं** ह्या अग्नितत्त्वाची जयाची आरोळी ठोकीत नवविचारांनीं उद्युक्त होऊन नवविचाराचे, नवीन तेजाचे, व नवीन तत्त्वांचे प्रचारक व्हायला पुढें आलें पाहिजे. भटशाहीचा 'जुलूम' म्हणजे कांहीं वज्रलेप नव्हे. जुन्या युगाची अंमलदारी सोडून दिली व श्रद्धानंदांच्या खुनापासून आणि त्रिशतसांवत्सारिक महोत्सवापासून सुरू झालेल्या नवीन युगाचे ते अंमलदार बनले म्हणजे **चोहोंकडून उसळणाऱ्या स्वातंत्र्यप्रवा-हांचे कालवे** देशभर पोंचविण्याचें अप्रतिम कार्य त्यांना सहज करतां येईल. माझ्या ह्या मातृभूमीच्या अंकावर बसण्याचा अधिकार हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याला आहे. जो तिच्या अंकावर बसेल त्याला तिच्या **मातृहृदयी चुंबनाचा लाभ** घडेलच घडेल. आणि म्हणून ह्या मातेभोंवतीं—ह्या हिंदमातेभोंवतीं—सर्वांनीं एकत्र होऊन **वन्दे मातरम्** ह्या मंत्रानें एकमेकांस कवटाळणें हें आज

प्रत्येकाचें कर्तव्य आहे. म्हणून सर्वांचीं मुखें एकमेकांना सन्मुख करा, सर्वांच्या हातांची झुलती माळ बनवा, ती सर्वांच्या कंठाभोंवतीं पडूं द्या आणि मध्यें सर्वांच्या हृदयाचें धगधगणारें यज्ञकुंड ठेवून तें भावनांच्या वाऱ्यानें भडकूं द्या म्हणजे त्यांत सर्व गैरसमजुतींची आहुती पडेल, सर्व अन्याय जळून जातील आणि **हिंदुस्थानच्या पारतंत्र्याची** त्यांत **राखरांगोळी** होऊन ही हिंदभूमि पूर्ववैभवानें विराजित होईल. असें व्हावें अशी कोण इच्छा करणार नाहीं ? " *

**प्रो. भानूः**—वा ! भले अच्युतराव !! छान केलेत !!! आपल्या व्यवसायाबद्दल अनुभवाचे दोन शब्द सांगून आटपा एकदाचे आपले भाषण.

**अच्युतरावः**—महाराष्ट्रातील सर्व सम्पादकांची संघटना करून, सर्वानुमते एक **वृत्तपत्र–संस्था** स्थापन करण्याचे माझ्या मनातून फार होते. माझ्या 'सन्देशा' तील दोष दृष्टिआड न करता महाराष्ट्रातील एखाददुसरे पत्र वगळले तर बाकीच्या साऱ्या वृत्तपत्राना नीट दिशा नाही. आपापसातील भांडणे चव्हाट्यावर मांडून बहुजनसमाजात आपल्या नावाचा शंखध्वनि होण्यासाठीच बहुतेक वर्तमानपत्रांचा उदय होत असतो. काही अनधिकारी व्यक्तींच्या हाती हा धंदा गेल्यामुळे आज त्याचा चहूबाजूनी विचका झाला आहे. व महाराष्ट्रातील साऱ्या वर्तमानपत्रात भारदस्तपणा आणि एकसूत्रीपणा आणण्याची माझी महत्त्वाकांक्षा अजिबात राहून गेली. एक दोघा होतकरू तरुणाजवळ माझ्या योजनेची परिस्फुटता नुकतीच मी केली होती. पण आता काय त्याचे ? या शिवाय, मागे

* **'जेधे–जवळकर'** (१९२७) या पुस्तकाला कै.अ.ब.**कोल्हटकरानी** लिहिलेल्या प्रस्तावनेतील भाग, पृष्ठ ४९–५०.

झालेल्या व आज असलेल्या महाराष्ट्रातील यच्चयावत् सामाजिक, धार्मिक, ऐतिहासिक, वगैरे इतर सर्व संस्थांचा साद्यंत इतिहास लिहिण्याचे मनातून होते. त्याचा उपयोग विशेषतः तरुण मंडळीला झाला असता. त्या संस्थानी आजवर केलेल्या कार्याचा आढावा त्यांच्या नजरेसमोर राहिला असता. एका प्रकारचे त्यांचे अज्ञान दूर झाले असते. असो. वृत्तपत्रव्यवसाया ( Journalism ) विषयी अधिक विवेचन वेळेच्या अभावी आज करता आले नाही, तरी पुढे केव्हा तरी संधि साधून तसे करण्याचे तूर्त आश्वासन देऊन, मी आपणा सर्वांची रजा घेतो. (टाळ्यांचा अगदी कडकडाट, **वन्दे मातरम्**ची सारखी गर्जना, **इन्किलाब झिंदाबाद**च्या मोठ्या आरोळ्या होतात. )

**प्रो. परांजपे**:—अहो करता काय हे आपल्या हर्षभरात ? इकडचा हा नवप्रदेश म्हणजे आंग्रेज प्रभूंच्या गुलामगिरीत खितपत पडणारा व निर्भेळ स्वातंत्र्याकरता धडपडणारा आपला पूर्वाश्रमीचा मायदेश **हिन्दुस्थान** नव्हे. असल्या अप्रस्तुत प्रकारानी भलतेच संकट मात्र ओढवून घ्याल समजलात ? ) अध्यक्ष **भावे** आपले उपरणे झाडण्याची घाई करू लागतात.)

**अण्णा कि०**:—अध्यक्षमहाराज, आपण घाई करू नका. थांबा जरा. वरील सर्व ठरावावर आपण आपल्या मंजुरीची सही करू नये तूर्त. कारण, जवळ जवळ आपल्या बरोबरीच्या आपल्या काही तोलदार व्यवसायबंधूंची या ठरावाना सम्मति नाही मिळाली अजून. महाराष्ट्रात हयात असलेल्या आपल्या त्या ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध बंधुवर्गाची निदान श्री. **तात्यासाहेब**, श्री. **अप्पा टिपणीस**, श्री. **काका खाडिलकर** व श्री. **पाठारे** वगैरे मण्डळींची आपल्या या ठरावाना मंजुरी मिळविली, तर म्हणतो दुधात साखर पडल्यासारखे होईल.

**देवल**ः–कबूल. ती मंजुरी मिळेतोपर्यंत हे ठराव व आपल्या इतर सर्व योजना वगैरे तूर्त गुलदस्तातच ठेवणे आपणाला भाग आहे.

[ इतक्यात मेघगर्जनेप्रमाणे जमीन हादरून गेल्याचा भास होतो व भयंकर निनाद होउन दोन्ही बाजूनी कर्कश किंकाळ्या झालेल्या ऐकू येतात. भीतीने सर्वजण एकमेकाकडे पाहू लागतात. अध्यक्षांची तर बोबडीच वळून जाते. ]

**अध्यक्ष**ः–( काकूळतेने ) अण्णा, कसे करायचे हो आता ? त्या उजव्या बाजूला, ती पाहिलीत का, एक भयंकर हडळ–**" अनुकूल असतील त्यांचे पाडीन दांत तरीच खरी मी "** असे किंचाळत–अरे बापरे ! आपले सर्वांचे दात पाडीन म्हणते ! दुसऱ्या बाजूने, ही केशकलाप मोकळा सोडलेली लांव–मुठी आवळून दण दण पाय आपटीत–" **आलें रिपु वधावया उरिं मारूनि जंबिया** " अशी गर्जना करीत–दोघी अवकळा इकडेच येत आहेत ! अण्णा, या शूर्पणखा-पूतनेचा डाव आम्हावर छापा घालून पुनश्च आम्हाला नेस्तनाबूत करण्याचा दिसतो. ( घाई घाईने ) अरे, आवऱ्याच ह्या ! चला–वाट सापडेल तिकडे पळा ! मरणाच्या द्वितियावृत्तीपेक्षा जिवाच्या जोगवणीसाठी मसण, किमानपक्षी शौचकूपहि पत्करली आम्हाला !! तिथेच जाऊन पडलेले बरे. आपल्या शेजारी असलेल्या नटवर्गाला म्हणाव बाबानो, तुम्ही तरी आमच्यासारखा प्रयत्न करून आपली एखादी बैठक भरवा आणि आम्हा सर्वांचे प्रस्तुत अपुरे राहिलेले कार्य तडीस न्या. आम्ही सर्वस्वी तुमचेच आहोत. तुमच्याबद्दल आमच्या मनामध्ये किल्मिष म्हणून बिलकूल नाही. असल्या आणिबाणीच्या प्रसंगी आम्हाला आमच्या मठीकडे सुरक्षितपणी न्यावयाला तुम्हीच समर्थ आहात. आम्हाला आधार देखील सर्वस्वी तुमचाच आहेरे बाबानो. पण–छेः छेः ! मध्येच उद्भवलेले हे गौडबंगाल ह्मणजे आजच्या आपल्या

बैठकीला हा एक अपशकुनच झाला–आयत्यावेळी रंगाचा बेरंग झाला–आमचा सर्वतोपरी उत्साहभंग झाला–झाले. **बैठक बरखास्त** ! सर्वांचाच बाजा वाजला ! ( धूम पळावयास पाहतात. )

**अण्णा कि०**:—थांबाल कि जरा **भावे**. मी काय ह्मणतो, ऐकून तर घ्या आधीं. निष्कारण गर्भगळीत होऊन निरर्थक त्रागा करून असे पळू नका. ऐका. पहिली, जी हडळ असे आपण ह्मणता, ती स्त्री–माझ्या '**रामराज्य-वियोग**' नाटकात **मंथरेचा** वेष घेतलेले **भाऊराव कोल्हटकर** आणि दुसरी आपल्या दृष्टीने लावसट समजली जाणारी स्त्री श्री. **पाठारे** यांच्या संगीत '**संभाजी**' नाटकात **तुळशीची** भूमिका घेतलेले **दत्तोपंत हल्लूचाळकर.** दोघेहि माझे पट्टशिष्य. आजची आपली बैठक अगदीच शुष्काशुष्क होऊन जाऊ नये, एवढ्याचसाठी योग्य प्रसंगी करमणूक ह्मणून, वरील दोघा गब्रुनी त्यांच्या हातखंड्या दोन भूमिका वठवून दाखविण्याची सुरवात केली आहे ही. ह्मणून ह्मणतो पळू नका; माघारे फिरा. अरेच्या ! ह्यानी तर मारे धूम ठोकली–पार दिसेनासे झाले !–ओफस् ! ! ( विजेचे बटण दाबल्या-सारखा सर्वत्र अंधार पडतो. )

* * * *

मी जो इतका वेळ स्वप्न-सृष्टीत तन्मय झालो होतो, तो **जी. आय. पी. रेल्वेच्या** परेल वर्कशॉपचा ७:४५ चा पहिला भोंगा ( Whistle ) झाल्यासरसा जागा होऊन उठलो; व परमेश्वराची करुणा भाकली; की "**हे प्रभो ! रात्रीसारखे गोड स्वप्न मला पडून दिवंगत झालेले माझे सारे आप्तेष्ट मला एकवार भेटू दे; इतके माझे तुजपाशी अनन्यभावाने मागणे आहे.**" नंतर निसर्गाच्या क्रमाविरुद्ध पळभरहि थांबण्याचे अवसान माझ्यात उरले नसल्यामुळे, उघडाच असलेल्या खोलीच्या दरवाजातून निघालो, तो थेट मागल्या दारची वाट !

॥ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

# परिशिष्ट.

**दशावतारी नाटकांचे** उत्पादक **विष्णुपन्त भावे सांगलीकर** हे होत. सुमारे ९०–१०० वर्षांपूर्वी मराठी रंगभूमीच्या स्थितीची महाराष्ट्रातील लोकाना कल्पनाहि नव्हती. ललीत, तमाशा, गोंधळ व बहुरूप्याचे सोंग हेच कायते त्यावेळी नाटकाचे प्रकार लोकाना माहीत होते. ललिताचा प्रकार जुनाच होता. तामाशे मुसलमानी अमदानीत सुरू झाले; आणि शेवटच्या बाजीरावाच्या राजवटीत ते फार फोफावले. रावबाजीच्या उल्हसित मनोवृत्तींच्या प्रेरणेने पुणे शहर, तमाशातलि डफ तुणतुण्यानी दुमदुमून गेले होते, इतकेच नव्हे तर पुण्यातील डफावरील थाप साऱ्या दक्षिण महाराष्ट्रात ऐकू येऊ लागल्यामुळे गुणिजनांचे ताफे पुण्याच्या पेशव्यांच्या पदरी पडू लागले. कलगीतुऱ्यांची भांडणे वगैरे थाटात लोकांची मने आकर्षिली जात. तमाशात मग्न होणे हेच त्यावेळी लोकांचे एक life's ideal ठरले होते.

**दिव्यात वात, की डफावर हात,**

अशा तऱ्हेच्या किळसवाण्या प्रकारानाच त्यावेळी राजा व प्रजा यांचा सारखाच आश्रय होता !

पुढे सन १८४२ त उत्तर कानडा प्रांतातील 'भागवत' या नावाची एक नाटक मण्डळी सांगलीस आली होती. त्या मंडळीचे दोन तीन प्रयोग श्रीमंतसाहेबानी व भाव्यानी पाहिल्यामुळे, भाव्यांच्या इच्छेला श्रीमंतानी चांगलेच प्रोत्साहन दिले. अशा तऱ्हेने संस्थानिकांच्या आश्रयाने दशावतारी नाटके करण्याचा पायंडा भाव्यानी घातला. विष्णुपंत भाव्यानी सन १८४३ मध्ये 'सीतास्वयंवर' या आख्यानाचा पहिला प्रयोग कै. **श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब** यांच्यापुढे करून दाखविला. पुढे भावे

आपली कंपनी घेऊन सांगलीबाहेर पडले. कोल्हापूर, पुणे, मुम्बई, अशा तीन चार ठिकाणी ते गेले. पुण्यास जाणारी पहिली नाटक मंडळी काय ती हीच. पुण्याच्या मुक्कामात **केशोपंत छत्रे** व **कृष्ण शास्त्री चिपळूणकर**, आणि मुम्बईच्या मुक्कामात डॉ **भाऊ दाजी, आबाशास्त्री, नाना शंकरशेट** व **सर जमशेटजी** वगैरे मंडळीनी विष्णुपंत भाव्यास बरेच सहाय्य केले. भाव्यानी सन १८६१ त हा नाटकाचा धंदा बंद केला. इतर अनेक कलामध्ये प्रवीण असलेले विष्णुपंत आपल्या वयाच्या ८२।८३ व्या वर्षी सांगलीस आपल्या घरी ता. ९ ऑगष्ट १९०१ रोजी प्लेगने वारले.*

अलीकडील नव्या मण्डळीला या दशावतारी नाटकांची काही कल्पना यावी, म्हणून खालील कथा सांगत आहो. अशा तऱ्हेचा जुना कथा-संग्रह स्थलविस्तारभयास्तव प्रकाशात आणता येत नाही.

सरासरी तीन चार तपापूर्वीची गोष्ट. तत्कालीन व आज विद्यमान असलेल्या एका विनोदी वृद्धाऽजोबानी स्वतः अनुभवलेली व आह्माला गमतीने सांगितलेली '**अललल डुर्र'च्या नाटकातील काही दृश्ये**—गमती—पैकी आज एकाच दृश्याचा नामनिर्देश करण्याचे ठरविले आहे.

* * * *

## भोमासूर झालेला रामा शागीर्द !

धड ना खेडे, धड ना शहर; परंतु लहानशा खेडेवजाच आमच्या **ठाण्या**सारख्या भिकारड्या हरामी गावात कधीकाळी चुकून एखाद्या पौराणिक नाटकमंडळीने आपला मुक्काम ठोकलाच, तर ती वेळ झाडून आह्मा थोरापोराना मोठ्या भाग्याची वाटून

*आप्पाजी विष्णु कुलकर्णीकृत 'मराठी रंगभूमि' (१९०३), अधिक माहितीकरता वाचकानी सदरहू पुस्तक पहावे.

व्यक्तिमात्राला आपले दैव फळफळलेले भासत असे. अशाच एका-वेळी " **पूर्णचंद्रोदय तासगावकर नाटक मंडळी** " गावात येऊन थडकल्याची भूमका फुटून सर्वत्राना सर्वप्रकारे आनंदी आनंद झाला. नाटककंपनीचा हातखंडा व नावाजलेला खेळ म्हटला म्हणजे **भौमासुर-वध**. काही शेलक्या गावगुंडाकडून कंपनीला उदार-नव्हे, उधार !-आश्रय मिळावयास काही वेळ अवेळ लागत नसे. शिष्टसांप्रदायानुसार त्यांची हक्काची संभावना होत असेच; पण माझीहि वरणी लागण्याचा प्रसंग सहसा टळला जात नसे. कसा ? तर, मागील दोन तीन पिढ्यापासून तपश्चर्या करीत असलेली आमची दोन जुनीपुराणी बाके व टांगण्याचा रॉकेल तेलाचा एक दिवा, इतकी ही सामुग्री नाटकवाल्यांच्या पदरात पडली, की वाटेल त्या दरांचे ३।४ ' फ्री पास '-रंगपटातहि प्रवेश करण्याच्या ' लाय-सन्स'सकट-घरपोच होत असत. त्यावेळीहि तसेच झाले; व गावात कंपनीचा मुक्काम असेतोपर्यंत मी त्यांचा सन्माननीय आश्र-यदाता बनलो !

सदरील कंपनीत हमेशा राक्षसी पुठ्याची कामे करणारी रामा आचारी ऊर्फ ' रामभाऊ गंजडी ' हे उपपद धारण करणारी एक व्यक्ति होती. ' **गंजडी** ' हे सनदशीर नामाभिधान त्याना त्यांच्या गांजा ओढण्याच्या प्राविण्याबद्दल गांजेकस परिषदेकडून बहाल करण्यात आले होते. ( ही गांजेकस परिषद प्रतिवर्षी गांजेकसांची परीक्षा घेत असे. व एकाच बैठकीत सर्वांच्यापेक्षा अधिक गांजा जो फस्त करून दाखवील त्यालाच ' गंजडी ' हे सन्मान्य उपपद मिळत असे. ) आमच्या ह्या व्यक्तीची सुस्ती व मस्ती दोन्ही सार-ख्याच हिशोबाने वाढीला लागलेली होती. एखाद्याशी भांडायला सुरवात केल्यावर केव्हाहि पड घेण्याचे या खवीसाला बाळकडू पाजलेलेच नव्हते मुळी. एकूण, भरतभूमीच्या पोटी असामान्य असे

हे एक नररत्न पैदा झालेले होते. त्याला उपमा ह्मणजे त्याचीच द्यावयाची. अशा या आमच्या राम्या शार्गीर्दाखेरीज राक्षसाधिपतीच्या कामाला लायक असा अष्टपैलू हिरा कंपनीत नव्हताच मुळी. कारण, बाळ निसर्गतःच तसे स्वरूपसुंदर होते ! ते थापटलेल्या मडक्यासारखे अवजड पण बसके डोके, त्या राठ केसाळ भिवया, बटबटीत डोळे, एका डोळ्याच्या बुबुळावर वाढलेला वडस, शेंबडाला सदैव आश्रय दिलेले फेंदरलेले ते नाक, बाबर ओठ, त्यातून लालट काळसर रंगात रूपांतर पावलेले व बाहेर टवकारून पहात असलेले पुढचे दोन दात, जलोदर झाल्याप्रमाणे किंवा सिमेंट पिंपाच्या आकाराशी सादृश्य असणारे ते पोट, मुद्गलाशी स्पर्धा करणारे ते हातपाय,धिप्पाड शरीरयष्टि, घोगरा भसाडा कर्कश आवाज, मुंगळ्यानी ठिकठिकाणी कुरतुडलेला तो खरबुजी चेहरा; सारांश, कोणत्याहि बाजूने व्यस्त प्रमाणात असलेली त्याच्या शरीराची ठेवण—इतक्या ह्या ईश्वरदत्त देणगीमुळेच एरवी पाहणारालाहि,

**राम्या भोमासुराचा बाप**

दिसत होता ! तथापि, पुढची त्याच्या सोंगाची सजावट निराळ्या तऱ्हेची असल्यामुळे, अंगावरील साज चढावण्याकरता त्याला रंगपटात दाखल व्हावे लागत असे. बरे, या 'डबल ड्यूटी'—रात्रपाळी—करण्याबद्दल आमच्या भोमासुर महाराजाना अलाहिदा मुशाहिरा काय मिळत असे म्हणाल तर, सोंगाच्या त्या रात्री मालकाकडून चार आण्याचा “ गांजा ” बक्षीस ! त्या रात्रीत तेवढा तो चिलमीवर चिलमी झोकून फस्त करून टाकावयाचा ! तोच खुराक ! कंपनीत सर्वानाच ती रात्र निराहार महाशिवरात्रीची ! श्रीयुत मालकबुव काय ते एकटेच, एक दोन स्त्री-पार्टी पोराना बरोबर घेऊन चोरून छपून फराळाच्या दुकानतून बटर बिस्किटे व सिंगल चहा घेऊन आलेले असावयाचे; व संधि साधून

सार्वजनिक नाटकशाळांची भेट घेऊन हळूच मागील दारातून नाटकशाळेत ( थिएटरात ) दाखल व्हावयाचे.

काय त्या थिएटराचे त्यावेळचे वर्णन करावे तितके अपुरेच होईल ! चहु बाजूच्या भिंतींना व वरच्या कौलाराला सत्रा जागी भगदाडे पडलेली, असे आमचे ते चंद्रमौळी थिटएर–ज्यात आज रात्री ‘ **पूर्णचंद्रोदय तासगांवकर कंपनी** ’ चा प्रकाश पडणार आहे–त्याच्या रंगपटाकडे नुसती नजर फेकण्यापेक्षा, गुरांच्या एखाद्या गोठ्यात जाऊन घटका दोन घटका बसलेले परवडेल ! तसल्या त्या धुळीचा गालिचा पसरलेल्या गलिच्छ खोलीत ( Painting Room ) केरोसीन तेलाच्या दोन टंबलरांच्या उजेडात प्रधान सेनापतीसह

## भोमासुर महाराजांचा शृंगार

चालला होता ! काय त्या वेषाचे व अनुपमेय ऐश्वर्याचे वर्णन करावे ! कंबरेपर्यंत सडक लोंबत असलेल्या वाखाच्या बनविलेल्या त्या जटा, मोराची पिसे लावलेला तो बेगडी किरीट मस्तकावर ठेवून दिलेला, सुपल्यासारखी दोन्ही कानावर अडकविलेली ती कुंडले, कपाळी शेंदराचा भव्य मळवट, डोळ्यांच्या खाली वर रंगीबेरंगी पट्टे ओढलेले, चेहरेपट्टी जास्त खुलून दिसावी म्हणून तोंडाला काळे फासलेले, ओठाच्या दोन्ही कडा पांढऱ्या स्वच्छ अणकुचीदार दोन कृत्रिम दातानी सुशोभित केलेल्या, मोत्यांच्या पेंड्यांच्या अभावी गळ्यात घातलेल्या फुटक्या मण्यांच्या व रुपेरी सोनेरी वर्ख लावून तयार केलेल्या श्रीवर्धनी सुपाऱ्यांच्या माळा, पुष्पहाराचेऐवजी छाताडावर लहानशाच गोल आरशांची प्रभावळ विराजमान झालेली, नाचताना गिरक्या घेतेवेळी परदेशी बायांच्या लहंग्याप्रमाणे वर्तु-लाकार फेर घेणारी एकावर एक अशी जवळ जवळ लक्तरे

झालेली—चारपाच लुगडी पातळें कंबरेभोवती गुंडाळलेली ( ह्या पैठण्या गावातल्याच चार दोन सार्वजनिक ठरलेल्या गावभवान्या-कडून पैदा केलेल्या असावयाच्या; इतर ह्या उडाणटप्पू नाटक्याना भिक घाल्तो आहे कोण ! ) त्यांच्यावरला कंबरपट्टा ह्मणजे भक्कम अशी सुंभाची दोरी करकचून बांधलेली: दोन्ही पायाना उड्या मारताना छुम् छुम् असा आवाज करणारे घुंगराचे वेष्टन दिलेले ! असल्या

## गजांत ऐश्वर्याने मंडित झालेला,

दिव्य देहधारी व अतुल पराक्रमी भोमासुर सम्राट चिलमी झोकून तर्र झाल्यानंतर मग आपल्या प्रधान सेनापति या खास परिवारासह-वर्तमान बाहेर पडावयाचा. पण पहिला प्रवेश सेनानायकांचा. त्यांचा हैदोस संपतो न संपतो तो प्रधानजींची स्वारी आरडत ओरडत दृग्गोचर व्हावयाची. उड्या मारण्याची याचीहि तहान थोडीबहुत भागली की शेवटी मग राळेच्या फेकीत, टाळमृदंगाच्या खणखणाटात उड्डाण करीत आक्रंदत पट्ट्याचे हात दाखवीत ( पट्टे 'टीन'च्या पत्र्याचे व तरवारी लाकडी असावयाच्या ) खाशांची स्वारी बोर्डावर ( stage) यावयाची; आणि श्रमातिरेकामुळे श्वासावरोध होऊन उर्ध्व लागल्यासारखे होईल तेव्हाच धापा टाकीत धाडदिशी मधोमध ठेवलेल्या एका खुर्चीवर येऊन आदळावयाची. पण या पूर्वापार वहिवाटीला आमचा भोमासुररूपी राम्या बेटा थोडा अपवाद होता. कसा ह्मणाल तर, एकीकडे निश्वास टाकीत असताहि त्या मरणोन्मुख अवस्थेतहि तो आपल्या उत्तरोत्तर अधि-काधिक किंचाळण्याने आकाशपाताळ एक करून सोडीत असे. जीर्णासनाचा ( लंगड्या खुर्चीचा ) परित्याग करून ऐटीने नाचत आत बुईंगात जाई व श्रमपरिहारार्थ चिलमीचे लगबगीने दोनचार

झुरके मारून, "अ: आः! डुर्रर्र्" असा आवाज करीत शाळेच्या उजेडात बाहेर प्रेक्षकाना आपल्या ऐश्वर्याचा देखावा क्षणैक दाखवून राम्या पुन्हा आत जाई. असा हा पाणचट प्रकार दोनचार वेळा करून दाखविला, की मग पुन्हा ताज्या दमाने अचकट विचकट शब्दोच्चार करीत, आरोळ्या ठोकीत, आपला विद्रूप चेहरा दाखवून बोर्डावर येऊन तो धिंगाणा घाली!! राम राम! काय लोकोत्तर हौस ही!!

आजच्या कुयोगामुळे ह्मणा—किंवा प्रेक्षकांच्या वा नाटकवाल्यांच्या दुर्दैवामुळे ह्मणा-भोमासुरमहाराज बाहेर पडतेवेळी राळ बेसुमार फेकली जाऊन कित्येक वर्षापासून आसन्नमरण प्राण्याप्रमाणे जीर्णावस्था उपभोगीत असलेल्या 'वुइंग' रूपी मांजरपाटाने पेट घेऊन एकच डोंबाळा झाला, व

## रंगभूमीवर लंकादहनाचा देखावा

हुबेहुब दिसण्याची वेळ येऊन गुजरली होती; पण तितक्यात एका इसमाच्या प्रसंगावधानाने कपडा ( जळका वुइंग ) खाडकन ओढला गेल्यामुळे सबंध थिएटरच्या थिएटर अग्नीच्या भक्षस्थानी पडण्याचा तो महा अनर्थ टळला गेला. हे सारे ठीक झाले; पण इतका हा अनर्थावह प्रकार घडला तरी, त्या भोमासुरी राम्या बोकडाची आरडण्याची खवखव आणि धांगडधिंगा घालण्याची खुमखुम, खरे पुसाल तर रतीमात्र ढळली नाही. हरामखोर पड्यात जाऊन, आणखी एक दोन चिलमी ठोकल्यामुळे पहिल्यापेक्षांहि अधिक चेकाळला. भीतीने मरगळलेल्या नाट्यलोलुप सभापंडिताना नवजीवन मिळावे ह्मणून की काय—राम्याने, होते नव्हते तेवढे आपले अवसान एकवटून मेघांच्या गडगडाटाशी व विद्युल्लतेच्या कडकडाटाशी स्पर्धा करणारी बेंबीच्या देठापासून अशी आरोळी

ठोकून दिली ह्मणता की जिच्यामुळे प्रेक्षकगण तर क्षणभर बर्फासारखा थंडावलाच, पण आजूबाजूच्या घरातील साखरझोपेत असलेली परकी मंडळी भेदरून जाऊन उल्कापात झाल्याच्या भीतीप्रमाणे आपल्या घरातून बाहेर पडून, थिएटराच्या जवळ रस्त्यावर जमा झाली. बिचारी मुकी जनावरे, ती कुत्री देखील–काही तरी अरिष्ट कोसळलेले आहे, अशा समजुतीने–पायात शेपट्या घालून 'क्यां क्यां' करीत जीव घेऊन सैरावैरा पळत असताना दिसली ! इकडे रंगमंडपात हसू येण्यासारखा घडलेला आणखी एक निराळाच प्रकारः नेमकी आमच्याच डोक्यावर ओळंब्यात असलेल्या

## बायकांच्या गॅलरीत

(हिच्या तक्तपोशीच्या फळ्या एकमेकीशी वितुष्ट पडल्याचे दर्शवीत होत्या.) एक सभ्य स्त्री आपल्या ६।७ वर्षांच्या लहानग्या बाबूला घेऊन नाटक पहात बसली होती. विदूषकराव मन मानेल तसला चावटपणा करून मंडळीना 'खो खो' हसवून एकदाचे निघून गेले; पुढे आवाहन करताच वक्रतुंड श्रीगजाननमहाराजांची स्वारी दृश्यमान झाली; व त्यानी नाट्याचार्य सूत्रधारबुवाना शुभाशीर्वाद देऊन ब्रह्मकुमारी सरस्वतीची वाट पहात काही वेळ विश्रांति घेत ते बसले. त्यानंतर 'धिग् धिग् तोम्' च्या तालावर मयूरासनावर आरूढ झालेल्या शारदामातोश्री पावले टाकीत मनसोक्त नाचल्या व काही वेळाने नाकी गमन करत्या झाल्या. परंतु इतका वेळ जागत बसलेला बाबू, झोपेने पेंगाळल्यामुळे आपल्या आईच्या मांडीवर स्वस्थ झोपी गेला.

तेव्हाच्या आमच्या या अमर्याद पौराणिक नाटकाना अंकादि प्रवेशांचे कोणतेच निर्बंध घातलेले नसावयाचे ! 'पोर्टर घंटा' हा आवाज ऐकून 'दिल्ली एक्स्प्रेस्' शिटी देत स्टेशनातून एकदाची

बाहेर पडली की रुळावरून सारखी घसरत आपला मुक्काम गाठा-यची. नाटकपात्रांची तऱ्हाहि थेट अशाच प्रकारची. वाटेल त्याने वाटेल तेव्हा रंगभूमीवर येऊन, हवी ती बतावणी करून आपला प्रवेश उरकून घ्यावा. सूत्रधारबुवा सांगाल तेव्हा, टाळ कुटायला तयारं असावयाचेच बिचारे. न असून करतील काय ?-पोटाची खळगी कशीबशी भरली पाहिजे आहे ना !

असो. बाबू इतका वेळ झोपेच्या गुंगीत होता खरा, पण बाराव्या अति क्रूरस्थानी आलेला आमचा भोमासुर शनिग्रह त्याला थोडाच सुखाने पडू देणार ! त्या सोट्या म्हसोबाच्या फोडलेल्या एकाच डरकाळीमुळे पोरगा अंगात सैतान संचरल्याप्रमाणें किंकाळ-तच एकाएकी जागा झाला; व आपल्या आईला बिलगून मोठ्याने आक्रंदू लागला. दोनचार घंटा झोपेत अवरोध होऊन तुंबल्यामुळे व आता भेदरून अनावर झाल्यामुळे बाबूकडून धारातीर्थाचा प्रसाद नेमका शेजारीच बसलेल्या आमच्या एका हलकट भांडकुदळ जानीदोस्ताला स्पशेल मिळाला ! बस्स-एवढेच कारण पुरे झाले-मग तो इसम शांत बसतो आहे कशाला ? लागलीच उसळून उभा राहून ग्यालरीकडे डोळे फाडून पहात दरडावून ह्मणाला:-" अहो बाई, काय थट्टा मांडली आहेत की काय ही ? आपल्या लाडक्या चिरंजीवाच्या मूत्र-विसर्जनाचा अभिषेक आमच्या अंगावर ? शिः ! सगळे कपडे खराब झाले ! आधी निपटून काढा ते ! इवलीशी कारटी घेऊन आलात कशाला नाटकाला ? कोणी वेठीला तुह्माला धरले होते, की तुमच्याच आश्रयावाचून नाटकमंडळीचे आता अगदी अडूनच राहिले होते ? एखादा जवळचा बोळा भिजवून आधी घ्या तो शुद्ध सात्विक प्रवाह आवरून !" वगैरे वगैरे तोंडास आले ते व तितके बहकला.

बाई बिचारी भीतीने पार गांगरली, आणि लज्जेने अगदी मेल्या-सारखी झाली. स्वतःलाच शिव्याशाप घेऊन, रडकुंडीस येऊन प्रत्ये-काची ती हात जोडून माफी मागत होती. करील काय! भोम्या-राक्षसाचे प्रायश्चित्त मिळाले वरच्या सोम्याला—सोम्याचे प्रायश्चित्त भोगावे लागले खालच्या गोम्याला—फिटंफाट झाली!

इतक्यात, वर आकाशात मेघांचा गडगडाट होऊन, विजा तळ-पून, तुफानवारा वाहू लागला; व भिंतीच्या व छपराच्या भगदडातून त्याचे झोत आत थिएटरात प्रवेश करून एका मिणमिण करीत कसाबसा जीव धरून राहिलेल्या दिव्या खेरीज बाकीच्या **साऱ्या बिजलीच्या बत्त्या** क्षणार्धात त्यानी मालवून टाकल्या. ठिगळांचा 'ड्रॉप' गडगडत खाली येऊन आदळला. बहुतेक सर्वत्र अंधार पसरला. मग कसले नाटक अन् कसले काय! घटकाभराने मुसळ-धारेचा पाऊस लागेल, या भीतीने थिएटरचे दरवाजे सताड मोकळे करून वा करवून प्रेक्षक मंडळी मोठ्या लगबगीने बाहेर पडली; आणि ज्याने त्याने आपल्या घरचा रस्ता आधी सुधारला. त्यात मीहि होतोच. असे सांगतात, पूर्वयुगात क्रोधाविष्ट अशा दशरथ-राजाच्या धनुष्याचा टणत्कार किंवा विकोपास चढलेल्या मारुती-रायाचा भुभुःकार एकताच स्त्रियांचे गर्भपात होत असत; पण या बहाद्दर राम्या पठ्ठ्याने आपल्या आरोळीबरोबर बाबूचा 'लघुशंकापात' केला! वाहवारे गब्रू! याचे नाव खरा प्रतापी अजब करणी!!

एतावता, नाटकमंडळीचा, तिच्या नाटकाचा, प्रेक्षकांचा असा हा अकल्पित बोऱ्या उडाला खरा, पण फारा दिवसांच्या हपाप-लेल्या आह्मा ग्रामकंटकांची मात्र घटकाभर आयतीच करमणूक होऊन शिवाय, '**पूर्णचंद्रोदय नाटकमंडळी**' च्या **चंद्राचा उदयास्त** एकच समयावच्छेदेकरून झाल्याची "**न. मा.**" पहावयाला मिळाली; इतकाच लभ्यांश! झाली संपली गोष्ट!!

———:०:———

## श्री. विश्वेश्वर यांची प्रसिद्ध होणारी पुस्तके.

# रंगभूमीवरील व्यासपीठ.



१ रंगभूमि, २ नाटकमण्डळ्या की अन्नछत्रे? ३ त्रिशंकूंचा बाजार अर्थात् क्लबी नाटकमण्डळ्या, ४ शौकी मण्डळींचे आश्रम (Amateur Clubs), ४ सिनेमांची सैतानशाही, ६ नाटककारांची फाल्गुनशाही, ७ संगिताचा सुळसुळाट, ८ शेवटली फोडणी! वगैरे प्रकरणातून नाट्यविषयासंबंधी सडेतोड उल्लेख केले असून, तरुण पिढीच्या चारित्र्यावर व राष्ट्राच्या भवितव्यतेवर नाट्य-क्षेत्रातील काही प्रकारांचा अनिष्ट परिणाम होत आहे, त्याबद्दल लेखकाने निर्भीड टीका केली असून, पुस्तक आबालवृद्धास वाचनीयच होईल, अशी त्याची रचना केली आहे.

---:o:---

# संभाजीचा दिव्य सन्देश!



संभाजीने आपल्या जिवाची होळी करून घेण्यात साऱ्या हिन्दूना धर्माचे दिव्य कसे दाखविले, हिन्दुसंघटनाच्या दृष्टीने अशा आत्मयज्ञांची आज किती महति आहे, व इस्लामी धर्मवेड्यांच्या मगरमिठीत हा मराठा सिंह का व कसा सापडला, वगैरे तऱ्हेची ऐतिहासिक चर्चा करून, व्यसनाचे आगर म्हणून संभाजीची चित्रे रेखाटणाऱ्या व त्याच्या चारित्र्याला कालिमा फासणारी विधवाळ विधाने करणाऱ्या दख्खनच्या दऱ्याखोऱ्यातील नाटक-कादंबरीकाराना व परप्रकाशित लेखकाना प्रस्तुत पुस्तकाचा कर्त्याने अमोल अहेर घातला आहे.